







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)


महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# दीपावली

साहित्य • कला • संगम

## श्रे य ना मा व लि—






वर्ष १५ वें
जुलै १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.



अनुक्रमणिका






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



## " महाराष्ट्रीं असावें— "

संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या ऐन समरप्रसंगाच्या काळांत महाराष्ट्रीय आणि गुजराथी यांच्यांत विनाकारण कटुता निर्माण झाली. आज द्विभाषिक राज्याचे पुरस्कर्ते आणि शासनकर्ते महाराष्ट्रानें गुजराथबद्दल प्रेम बाळगावे आणि गुजराथनें महाराष्ट्राबद्दल अढी धरूं नये असें कंठरवानें सांगत असले तरी इतिहासाची साक्ष फार निराळी आहे. महानुभाव संप्रदायाचा प्रवर्तक श्री चक्रधर हा मूळचा गुजराथेतील. पण या थोर व्यक्तीचें महाराष्ट्रावर फार प्रेम होतें. मराठी भाषेंतील पहिलीवहिली महत्त्वाची वाङ्मयीन कृति महानुभावांचीच. इतकेंच काय पण श्री चक्रधराच्या महाभाष्यांत महाराष्ट्राची प्रशस्ती वारंवार आली आहे. गुजराथच्या सुपीक भूमींत वाढलेल्या या थोर महानुभावाचें महाराष्ट्रवर्णन वाचकांना खात्रीनें आवडेल.

" आपण कव्हणातें नेणिजे ऐसा स्थानीं असावें। कानडेदेशां : [illegible] वचावें : ते विषयब्रहळदेशः तेथ अवधूत मान्य। महाराष्ट्रीं असावें मातापुरा कोल्हापुरा न वचावें तियें साभिमानियें स्थानें साधकांसि [illegible]घ्न करीति। "

श्री चक्रधरोक्त सूत्रपाठें.

### महाराष्ट्राच्या सीमा

" देश म्हणजे खंडमंडळ। जैसे फलेठाणापासौनि दक्षिणेसि मऱ्हाटी भाष जेतुला ठाइं वर्ते ते एक मंडळ। तयासि उत्तरे बालेघाटाचा सेवट असे। ऐसे एक खंडमंडळ। मग उभय गंगातीर तेहि एक खंडमंडळ। आनि तयापासौनि मेघकरघाट ते एक मंडळ। तयापासौनि आवघे वराडः तेहि एक मंडळ। पर आवघीचि मिळौनि महाराष्ट्राचे बोलिजे। किंचित किंचित भाषेचा पालट असे म्हणौनि खंडमंडळें म्हणावी। मग ऐसे मंडळींचा पैला मंडळासि जायेः आन पैले मंडळींचा ऐलासि ए।

× × ×

### इतर देशीं कां राहूं नये !

" एका देशाचिया भूमी राजसा पर मनुष्यें राजसे नव्हेति। एक देशीं मनुष्यें राजसे आन भूमी सात्विका का तामसा। एके देशीची भूमी राजसा सात्विका पर मनुष्यें राजसे तामसें। ऐसे विचित्र प्रदेशाचे महद्भूतांसहित पालट असत। मनुष्येचे पालट असतः पदार्थांचे पालट असत। वारा : झड : उष्ण : उदकें : पाषाण : वृक्ष : धान्यें : अन्नें : औषधें इत्यादिकांचे देशपरत्वें पालट असत। "

\+ + +

### ' महाराष्ट्र म्हणजे महंत राष्ट्र ' त्याचे नाना भेद

एक महाराष्ट्र जड : दुसरें चेतन। जडांत देश : गांव : विजन : निद्रा स्थान : भोजन स्थान : ऐसे पंच भेद असत। आन चेतन म्हणतालेया दोन्ही भेद : एक स्थावर : दुसरें जंगम। स्थावरांतु नित्यकीं माड : नैमित्यकीं दाट साइली जयाची ते रुख लाभेति। आतां जंगम म्हणजे चरणल ते। तयांचे भेद सूक्ष्म जंतुपासौनि मनुष्यपर्यंत। इतुकेयांसि अभय वर्ते जयाचेनि ते पुरुष महाराष्ट्र। तयाचे दोनि भेद। बोध अनुसरणापासौनि शब्दांचा निर्वाळापर्यंत एक एकचि पुरुष हो अथवा एकैकापासोनि एक एक गुण होए। ऐसे बहुत आसत। तया आवघेयोचा थोवा मिळौनि एक भेद आन जेतुके सुहृद तेतुकेयांचाही दुसरा भेद। ऐसें जड चेतन भेद मिळौनि महाराष्ट्र म्हणजे महंत राष्ट्र। म्हणौन महाराष्ट्र। महंत म्हणजे थोर। तर तेचि थोरी कवणें कवणें अर्थें असे पा। ना। सात्विक हा एक ! दुसरा सुखरूप ! तिसरा इष्टकारक ! चौथा निर्दोष ! पांचवा सगुण। तर निर्दोष म्हणजे अनिष्ट न निफजे। आन सगुण म्हणजे इष्टचि निफजे। ऐसे पांचा अर्थभेदीं महाराष्ट्र थोर। आणिक कैसे थोर। ना ! जेतुका अर्थी आपली थोरी असे तेतुलाहि अर्थी आणिकासि थोरी करी। थोरापासोनि महाथोर तयातें महाराष्ट्र म्हणिजे। तर राष्ट्र शब्दें आणिक देश बोलिले असत कीं। ना ते भूमीनें थोर होति पर गुणवृद्धीनें नव्हेति। आन राजस तामस उदासही असत। म्हणौन ते महाराष्ट्र नव्हेति। एवं जड–चेतनांमध्यें मागिलां पांचा गुणांचे अनुवर्तन जेतुलां ठाइं असेल तेतुला तेतुले ते महाराष्ट्रची जाणावें। "

—आचार महाभाष्य

### सारांश—

महाराष्ट्र सात्विक : तेथचे जड–चेतन पदार्थ तेहि सात्विक : तेथ असता शारीर मानसिक कव्हणीचि उपद्रव नुपजति : आणिक देशी शारीर मानसिक उपद्रव उपजला असे तो महाराष्ट्रीं वसता शमे : धर्मसिद्धी जाए ते महाराष्ट्र.

—आचार स्थळ



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : ५

**वरदात्रि लक्ष्मी**

शय्यागृहं तव पिता जगतां नियन्तु–
र्भ्राता मृगाङ्क इतरः पुनरङ्गभूषे ।
वक्षस्यमुष्य वरदे त्वमवस्थिता तद्
वाल्लभ्यमम्ब भवदीयमनन्यलभ्यम् ॥

— वेङ्कटाध्वरिकृतं लक्ष्मीसहस्रम्

शय्यामंदिर होत तात तव गे विश्वप्रभू विष्णुचें ।
बंधू कौस्तुभ, चंद्र शोभति तुझे त्याचीं खरीं भूषणें ।
ऐसी तूं वरदा असून असशी वक्षीं तयाच्या नत ।
ऐसें प्रेम तुझें किती विरळ गे अन्यांस अन् लाभणें ॥

— सदानंद रेगे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दीपावली
जेष्ठ शके १८८१ जुलै १९५९



# ध्रुवपद



हें सारें खरें असेल
अथवा आहेहि.
आणि तरीहि—
माझ्या गीताचें ध्रुवपद एकच आहे
माणसाच्या माथ्यावर
दारिद्र्यासारखा दुसरा शाप नाहीं
पृथ्वीच्या पाठीवर
इतकें अमंगळ, इतकें भयानक, इतकें भेसूर
दुसरें पाप नाहीं !
जोंपर्यंत माझ्याजवळ गीतासाठी शब्द आहेत
शब्दासाठी श्वास आहे
तोंपर्यंत—

याच ध्रुवपदाचा
माझ्या गीताला ध्यास आहे !
हें सारें खरें असेल
अथवा आहेहि.
पण तरीहि—
पापणीच्या केसांत अडकलेल्या या थेंबाकडे
तिऱ्हाईतपणें पाहूं नका
मातीचीं आसवें मातीला मिळतील
असें म्हणूं नका
दगडाच्या डोळ्यावरील हें दव ओलांडून



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

पुढें जाऊं नका
या लाचारीवर नवलीचें नाणें मिरकावून
दयाशील होऊं नका
कारण—
या रडणाऱ्या मातीच्या गर्भात
धसधसत आहेत
शेषकालियासारखे सहस्र नाग
या दगडांच्या उशीवर झोपली आहे
लक्ष दावानलांची आग
त्या नागांना नाहीं देश
त्या अग्नीला नाहीं संस्कृति
नाहीं देव, नाहीं धर्म, नाहीं नीति
त्यांच्याजवळ आहे केवळ
गति !
आंधळी गति !

आपल्या जहरी जिभांनी, केशरी ओठांनी
संसारांतील सारें सौंदर्य पिऊन टाकणारी
राक्षसी गति—
भूमीवर पडलेल्या देवळांच्या अवशेषांवरून
पलंगावर पडलेल्या स्त्रियांच्या स्तनावरून
उन्मत्तपणें धावणारी
बेहोष गति—
कचकड्यांच्या बाहुल्यांचा
प्लॅस्टिकच्या रंगीत खेळण्यांचा
हा सारा मीनाबाजार
चरणाखाली चिरडीत जाणारी
निर्दय गति

ती थांबणार नाहीं
न्यायाच्या मंदिरापुढें
शांतीच्या स्तंभापुढें
आकाशरसानें भरलेल्या
वात्सल्याच्या कुंभापुढें !
आणि म्हणून सांगतों—
हें सारें खरें असेल
पण तरीहि—

— कु सु मा ग्र ज

केरळांत भस्मासूर




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




**पु. भा. भावे**

त्या घराकडे नुसतं पाहिलं म्हणजे मला कांहीं तरी चुकल्यासारखं वाटें. कस-तरी भय वाटे. कसलं तरी गूढ आकर्षण वाटे. तसं म्हणाल तर घर कांहीं मोडकं पडकं नव्हतं. भलं भक्कम एखाद्या किल्ल्या-रखं तें घर होतं. कुठल्याहि सामान्य घरापेक्षां आकारानें तें खूप ाठं होतं. त्या घराची निगादेखील चांगली राखलेली दिसत होती. घर कांहीं कुठें रानावनांत नव्हतं. गांवातल्या एका मोकळ्या कळ्या आणि अद्यावत् भागांत तें घर होतं, आणि तरीहि घर मोठं उदासवाणं वाटे. ह्या घरांत कांहीं तरी विलक्षण प्रकार डत असतील, असं त्या घराकडे पाहून वाटे.

ते घर खरोखर विलक्षणच होतं. त्या घराची दारं–खिडक्या नेहेमी ; असत. त्या घरांतली माणसं तर मी कधीं पाहिलीच नाहींत. असं टे कीं हें घर अगदीं निर्मनुष्य असलं पाहिजे, पण निर्मनुष्य घराच्या प्रवेशिकेंत एखादी स्वयंप्रेरिका कशाला उभी राहील ? निर्मनुष्य घराच्या खोल्यांतून दिव्यांचा उजेड कशाला येईल ! पाठीवर कपड्यांचे गाठोडें घेतलेला धोबी तिथून येतांजातांना कशाला दिसेल ? निर्मनुष्य घरांतल्या उद्यानांत एखादा माळी वावरतांना तुम्हांला कशाला दिसेल ? पण माणसाच्या वसतीच्या खुणा सांगणाऱ्या ह्या अशाच गोष्टी मी त्या घरांत पाहिल्या होत्या. त्या घराच्या प्रवेशिकेंत जवळ जवळ नेहमी मला एखादी मोटारगाडी उभी असलेली दिसे. आणि त्या घराच्या उद्यानांत मला पुष्कळदां माळी दिसलेला होता. माळी उद्यानाला पाणी देत असे. झाडांची पानें खुडित असे, फुलांची जोपासना करीत असे. आणि तरीहि ते उद्यान देखील मला एकापरीनें उजाड वाटे. उदास वाटे एखाद्या स्मशानांतल्या झाडांसारखी तिथली सुंदर फुलझाडें मला वाटत. आणि तें उद्यान एखाद्या भूतसृष्टींतल्या उद्यानासारखें वाटे. तें घरहि कां कुणास ठाऊक मला तसेंच

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*तीं वेल आणि तीं मुलगीं माझ्या दृष्टीनें आतां निश्चित एकरूप झाल्या होत्या.*
*तीं वेल जितकी खरी होती तितकीच तीं मुलगीही खरी होती.*
*तिचे जें जिणें होतें, तेंच हिचेंही होतें.*

---

अमानुष सृष्टींतलें वाटे. तिथली ती गाडी, तिथला तो माळी, तिथल्या त्या रंगीबेरंगी काचांनीं मढविलेल्या माड्या, सारी मला एका वेगळ्याच सृष्टींतली वाटत. जागोजाग चिकाचे, बांबूचे आणि मखमलींचे पडदे सोडलेले ते घर, मला मृतसृष्टींतले वाटे, भूतसृष्टीतले वाटे. आणि म्हणूनच मला त्या घराकडे येतांजातां निरखून पाहिल्याविना रहावत नसे. त्या घराकडे पाहिल्यावर मनाला कसली तरी खिन्नता येई. औदासिन्य येई. चांगले सुंदर घर असूनहि ते घर कसें अवकळा आल्यासारखे वाटे. त्या वस्तींत त्या घरासारखें दुसरें घर नव्हतें. अनेक अर्थानीं नव्हतें. आणि तरी ते घर कुणाचे हे मात्र मला ठाऊक नव्हतं. मला ठाऊक नसलं तर नवल नाहीं. कारण मी कांहीं त्या वस्तीचा रहिवासी नव्हतों. पण त्या वस्तींतल्या अनेक माणसांनाहि ते घर कुणाचं हें ठाऊक नव्हतं. "आहे खरं बुवा कुणाचं तरी." "कुणा मोठ्या माणसाचं असावं—तिथं नेहमीं मोटर उभी असलेली दिसते." "तिथें कोण रहातं कुणास ठाऊक, पण त्या घराची दारं-खिडक्या नेहमी बंद असतात." ह्या तऱ्हेचं मला आधींच असलेलं ज्ञान पुन्हां देणारी उत्तरें माझ्या प्रश्नांना मिळालेली होती. पण तें घर कुणाचं हे मात्र अद्याप मला कुणीच सांगत नव्हतं. माणसं अन्य माणसांविषयीं किती उदासीन आणि अज्ञानी असूं शकतात ह्याचा हा पुरावा होता. भर वस्तीतलं घर पण तें कुणाचं, तिथं राहतं कोण, हें त्या वस्तींतल्या माणसांनाच ठाऊक नाहीं ! तसा कांहीं संबंध नसतांना त्या घराविषयीं वारंवार प्रश्न विचारणं मलाहि अडचणीचं वाटे. न जाणो, मला कुणी एखादा होतकरू घरफोड्या समजायचे ! आणि तरीहि त्या घराविषयीं माझं कुतूहल मात्र वाढतच होतं. त्या घराकडे मी येतां जातां पहात असे. अगदीं तळमजल्यापासून तिसऱ्या मजल्यापर्यंत पहात असे. त्या घरांत जीं कुणी माणसं रहात असतील ती असोत; पण त्या लोकांना झाडा-झुडपांची आवड खूप होती हें निश्चित. त्या घराभोंवतीं तर उद्यान होतंच; पण त्या घराला अगदीं वरच्या गच्चीभोंवतीं आंगच्याच बांधलेल्या लांबलचक संगमरवरी कुंड्याहि होत्या. त्या कुंड्यांत हिरवेगार मखमली गवत होतं. आणि एका कुंडीच्या कोंपऱ्यांत उंचावत होती एक फुलवेल. ती वेल चांगली हिरवीगार आणि भरदार होती. आणि निळ्या रंगानें रंगविलेल्या एका बांबूच्या सुंदर चौकटी-वर ती वेल चढत होती.

घरावर झालेली ती गवताची रांगोळी सुंदर होती. वर आभाळाकडे पहात वाढणारी ती वेल सुंदर होती, पण त्या गवताकडे व त्या वेलीकडे पाहतां पाहतां पुन्हां तोच विचार माझ्या मनांत आला. मला वाटलं हें घर नव्हे, कबरस्थान आहे. थडग्यावर केलेली ही सारी स्मशानशोभा आहे.

त्या वेलीकडे पहात असाच एके सायंकाळीं मी वाटेवर थबकलों. मी थबकलों, कारण माझ्यासमोरच एक पडदे लावलेली गाडी त्या घराच्या प्रवेशिकेंत जाऊन थबकली. आणि माझ्या मनांत पुन्हां प्रश्न उमटला, हें घर आहे तरी कुणाचं ?

त्याच वेळीं माझ्या मागें कुणीतरी येऊन उभं राहिलं आणि, घोगऱ्या स्वरांत प्रश्न आला—

"तुम्हांला काय पाहिजे ?"

एक गणवेषांतला नगररक्षक चमत्कारिक दृष्टीनें माझ्याकडे पहात मला विचारीत होता. "हें घर कुणाचं ?" त्याच्या प्रश्नाला मी माझ्या प्रश्नानं उत्तर दिलं.

"तुम्हांला काय पाहिजे !" त्याचा प्रश्न त्यानें मला पुन्हां विचारला.

"हें घर कुणाचं तेंच मला पाहिजे आहे." माझाच प्रश्न मी पुढें दामटला व त्या गणवेषधारी माणसाच्या डोळ्यांतला संशय शांत करण्यासाठीं म्हणालों, "मी करविभागांतला माणूस आहे. कुणाचं तें जरा सांगाल काय ?"

त्या गणवेषधारी बावळटानें माझ्याकडे पुन्हां एकदां आपादमस्तक पाहून घेतलें. अर्थात् माझा वेष एखाद्या चोरासारखा नव्हता. फारच तर माझ्या मनांतील भाव चोरटेपणाचा असेल. पण गणवेषधाऱ्यांना मनांतले भाव दिसत नाहींत. त्यांना केवळ बाहेरचा वेष दिसतो. त्या वेषावर संतुष्ट होऊन महारानिल्हे पोलिस उत्तरला—हे घर कुणाच ते मलाहि ठाऊक नाहीं !"

बरोबर आहे ! ह्या पोलिसांना बहुतेक गोष्टी ठाऊक नसतातच ! चोरी होऊन गेल्यावर ह्यांना कळतें कीं चोरी झाली. आणि हत्या झाल्यावर ह्यांना कळते कीं हत्या झाली ! कुठल्याहि गोष्टीची अगाऊ कल्पना ह्यांना नसतेच ! चोरी कशी झाली आणि हत्या कुणी केली, हे नंतरहि पुष्कळदां ह्यांना कळत नाहींच.

पादत्राणें वाजवीत पोलीस दूर निघून गेला आणि मी त्या घराकडे पहात राहिलो. घरावरील त्या वेलीकडे पहात राहिलो, आणि माझ्या-जवळून कुणी रेंगाळत निघून गेले, एकदां गेले, दोनदां गेले आणि तीनदां गेले. मी डोळे उचलून पाहिले, एक अस्ताव्यस्त कपड्यांचा तरुण माणूस त्या घराकडे डोळ्यांत प्राण आणून पहात होता आणि रेंगाळत चालत होता. म्हणजे त्या घराविषयीं कुतुहल बाळगणारा मी कांहीं एकटाच नव्हतो तर !

"काय हो" त्या फेऱ्या मारणाऱ्या तरुणाला आडवा होत मी विचारले, "हें घर कुणाचे ?"

दहा क्षण गेले, वीस गेले त्या तरुण माणसानें मला कांहीं उत्तरच केले नाहीं. जणूं माझा प्रश्न केवळ त्याच्या कानावरून गेला. कानांत शिरला नाहीं. त्यानें नुसते एकदां माझ्याकडे पाहिल्यासारखे केले व पुन्हां तो त्या घराकडे पाहूं लागला. आणि गोंधळून आतां मी त्या माणसाकडे पाहूं लागलो. त्याची दाढी वाढलेली होती. डोळे ओढलेले होते. कपडे चुरगळलेले होते. पण स्वच्छ होते. फार स्वच्छ होते. आणि त्याची कांतीहि मोठी नितळ होती. शरीर बांधेसूद होते. आणि त्याच्या डोळ्यांत कसली तरी विलक्षण चमक होती. कसला तरी फिरता प्रकाश होता. जसा एखाद्या कवीच्या डोळ्यांत असावा. मद्यप्याच्या डोळ्यांत असावा.—



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



# भारतीय लोकनृत्यें

( केरळ )

केरळ म्हणजे निसर्गसौंदर्याची लयलूट. सागराचें सान्निध्य आणि नारळीपोफळीच्या हिरव्यागार बागा यामुळें केरळच्या सौंदर्यांत विलक्षण भर पडली आहे. अशा सौंदर्यपूर्ण प्रदेशांतील केरळवासी जनता भातशेतींत आणि बागायतींत अष्टौप्रहर राबते. आणि हे कष्ट संपले कीं त्यांचा नव्या वर्षाचा 'ओनम' हा सण येतो. त्या दिवशीं होड्यांची शर्यत असते. या होड्या त्यांच्या नेहमींच्या मासेमारीच्या [illegible]न जरा मोठ्या असतात. या शर्यतीचं केरळदेशीय जनतेला [illegible]निवार वेड आहे कीं एखाद्या माणसानें अशा किती शर्यती पाहिल्या आहेत या माहितीवर त्याचं वय अजमावतात.

'ओनम्' या सणाच्या दिवशीं सर्वत्र आनंदी आनंदी. सृष्टीनें भरघोंस पिकाचं नवे अलंकार धारण केलेले असतात. ग्रामीण कन्यका एका प्रशस्त मैदानांत फुलांचें एक वर्तुळ तयार करतात. त्याला 'आटाप्पू' असं म्हणतात.

या आटाप्पू 'मध्येंच साऱ्यांनीं नाचायचं. या नृत्यप्रकारांत नर्तक आपल्या हातांच्या हालचालींनं कणसं उगवली आहेत, पानंडोलताहेत असे अविर्भाव दिग्दर्शित करतात. या नृत्याचं नांव 'काई कोट्टकली' या नृत्यासारखाच आणखी एक नृत्यप्रकार म्हणजे 'कुम्मी' लोकनृत्य. याच प्रमाणें 'कोलट्टम्'. या नृत्यप्रकारांत नर्तक हातांत काठ्या घेतात.

मलबारचे मोपलेहि नाचतात. त्यांच्या आवडत्या नृत्याचं नांव 'मोपला कली'. हा नाच चालू असतां मोपला मुसलमान जुनीं लोकगीतें साभिनय म्हणतात. यांतील कांहीं गाणीं भक्तिपर तर कांहीं शृंगारिक असतात. या नृत्याचं वैशिष्ट्य म्हणजे त्यांत टिपऱ्यांचा उपयोग करतात. या नृत्याला लय असतेच पण त्याबरोबर त्यांत आवेश आणि उत्साह असतो.

पण केरळमधील सर्वांत प्राचीन लोकनृत्य म्हणजे पुलयर कली नृत्य. या नृत्यांत केरळवासियांची शौर्यपूर्ण परंपरा जतन केली गेली आहे. या नृत्याला गति आणि आवेश असल्यामुळें यांत प्रामुख्यानें पुरुषच भाग घेतात. हें मुख्यतः हरिजनांचें नृत्य आहे. केरळांत हरिजनांना 'पुलय' म्हणतात. व हेच खरे शेतकरी. ओनम् या सणाच्या दिवशीं हें नृत्य नेहमीं केलें जातें. या नृत्याला पार्श्वभूमी दाखल रामायण-महाभारतांतील कथाप्रसंगावरचीं गाणीं म्हटलीं जातात.

केरळमधील आणखी एक लोकप्रिय नृत्यप्रकार म्हणजे 'ओहमहुल्लल'. ही कथाकलीची प्राकृत आवृत्ति. याचा थोडक्यांत अर्थ 'धांवणें आणि उड्या मारणें.' या नृत्यप्रकारांत नाचणारा एकटाच. तो कथाकलीचाच पोशाख करतो. त्याला जोडीदार म्हणजे एक ढोलक्या आणि घंटा वाजवणारा. बाकीं अभिनय आणि गीतें म्हणणाऱ्याचें काम त्याचें एकट्याचेंच. कांचन नंबियार यांनीं हा नृत्यप्रकार १५० वर्षांपूर्वी रूढ केला. कथाकलीच्या शिष्टमंडळींतील लोकप्रियतेच्या प्रतिक्रियेंतूनच हा नृत्य प्रकार जन्माला आला.

हल्लीं हा नृत्यप्रकार फारसा लोकप्रिय नाहीं. कारण याची मदार एकाच माणसावर असते.

( चित्रें पृष्ठ २ वर )

— कथा-कली

• • •

किंवा वेड्याच्या डोळ्यांत असावा, त्याच्या डोळ्यांतून एक उत्कट, भावनाशील आत्मा डोकावत होता. आणि त्याच्या डोळ्यांकडे पाहिले म्हणजे मग त्याच्या अस्ताव्यस्त वेषाचा विसर पडत होता. आणि खरेंच ! त्याचा वेषहि कांहीं वेगळाच होता. त्याच्या डोक्यावर घडीची मखमली टोपी होती. त्यानें अंगांत बंद गळ्याचा कोट घतला होता. (त्या कोटाची एक-दोनच बटनें लागलेलीं होती.) धोतराइतका अघळपघळ शुभ्र पायजमा त्याच्या पावलावर लोळत होता. आणि काळ्याशार मखमलीचे जरतारी चढाव त्या पायजम्याखालून डोकांवत होते. त्याच्या मस्तकावरील केस काळेशार व कुरळे होते. आणि त्याच्या कपाळावर केशरी गंधाची टिकली होती.— विचित्र ! फारच विचित्र ! हा माणूस होता कोण, होता कुठल्या गांवचा ! कारण हा माणूस बहुधा आमच्या गांवचा नव्हता. त्याच्या वेषांत, त्याच्या वागण्यांत व त्याच्या दिसण्यांतहि परके आणि अनोळखी असें कितीतरी होतें. तर मग हा येथे आला होता कशाला ! व त्या घराकडे पहात होता कशाला ! माझी मूळ कल्पना मला आतां पुन्हां आठवली. त्या गुंगीत असलेल्या माणसाच्या खांद्याला निसटता स्पर्श करून मी त्याला पुन्हां विचारले, “हे घर कुणाचं, ते तुम्हांला ठाऊक आहे कां ?” चार-दोन क्षण तो थांबला. त्यानें कपाळाला पंजा लावून मला अभिवादन केले. प्रथम त्याचे ओठ नुसतेच हलले व मग त्याच्या तोंडातून शब्द उमटले, “[illegible] उत्मानअली अकबरअली !”

—उस्मानअली अकबरअली ! हे नांव मी ऐकलेले होते. हे घर उस्मानअली अकबरअलीचे, हे त्याच गांवांतल्या पोलिसांना ठाऊक नव्हतें. आणि ते ह्या परक्या माणसाला कसे ठाऊक ? त्याचे तेथें काय काम होतें ? तो त्या घराभोंवती कां फिरत होता !

मी त्या रेंगाळत चालणाऱ्या तरुणाकडे पाहिले, मी त्या घराकडे पाहिले, आणि क्षणार्धांत त्या घराचे प्रचंड लोखंडी फाटक उघडले. एक कोरीकरकरीत गाडी वळण घेत आली. वळण घेत आली आणि मंदावलेल्या वेगानें त्या फाटकांत शिरली. ह्या गाडीलाहि शुभ्र पडदे लागलेले होते. चाकाशीं बसलेल्या काळ्या राक्षसकाय सारथ्या विना गाडींतलें दुसरें माणूस म्हणून दिसत नव्हतें. काय त्या गाडींत कोणीच नव्हते !—कोण होते त्या गाडींत ? मी निरखून पाहिले. आणि तो तरुणहि निरखून पहात असल्याची जाणीव मला झाली. त्या आवरण घातलेल्या गाडींतून मागच्या अंगानें एक पंजा बाहेर निघालेला दिसत होता. केवळ एक पंजा ! सुकुमार–पिवळा, गोरा–मेंदीनें रंगविलेला ! त्या पंजालाहि व्यक्तित्व होतें, वय होते ! निश्चित् तो कोणा निरागस, अठरा एकोणीस वर्षांच्या मुलीचा

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पंजा होता ! सहज हंसणाऱ्या आणि रडणाऱ्या, स्वप्नें पाहणाऱ्या आणि त्या स्वप्नांवर श्रद्धा ठेवणाऱ्या अल्लड मुलीचा पंजा ! त्या पंजाचीं पांची बोटें निमुळती आणि कांतिमान् होती ! आणि त्या पैकीं एका बोटावर लकाकत्या हिऱ्यांची आंगठी होती ! गर्द हिरव्या रंगाच्या त्या प्रचंड गाडींतून तो इवलासा पंजा कांहीं क्षण दिसला, आणि अदृश्य झाला.

गाडी आंत गेली आणि ते प्रचंड लोखंडी फाटक बंद होऊं लागले. झेप घेतल्यासारखा तो तरुण माणूस जणूं त्या दाराच्या दिशेनें निघाला. दार पूर्णपणें बंद झाले. कुठून तरी एक रिक्षा आली. त्या तरुण माणसानें स्वतःला त्या रिक्षांत झोंकून दिले. आंत गेलेली हिरवी गाडी मागे सरत होती व उग्र मिशांचा काळा-रोम सारथी आपले खुनशी डोळे वटारून वाटेकडे पहात होता. रिक्षा दिसेनासा झाला, तो तरुण दृष्टीआड झाला. त्या घराचे लोखंडी फाटक बंद झाले, ते घर पुन्हां तसेच निश्चल व उदास दिसूं लागले. अधिकच उदास व अधिकच निश्चल दिसूं लागले. पण आतांच येथे कांहीं हाल-चाली घडून गेल्या होत्या. काय तो माझा केवळ भ्रम होता ?

ते घर अगदीं निर्मनुष्य दिसत होते. पण आतांच ह्या घरांत एक मोटर आली होती. व मग दुसरी मोटर आली होती. एक लालभडक डोळ्यांचा उग्र मिशांचा, व केसाळ टोपीचा काळारोम सारथी आतांच मी एका गाडींत पाहिला होता. व त्याच गाडींतून एका तरुण मुलीचा चित्रासारखा पंजा बाहेर आला होता. माझ्या स्मृतीवर त्या हाताचे अगदीं स्पष्ट चित्र उमटलेले होते. केवळ त्या हातावरून मी त्या मुलीच्या चेहेऱ्याची, डोळ्यांची, केसांची, व आकृतीची कल्पना करूं शकत होतो. त्या मुलीचा चेहेरा बदामासारखा असेल. डोळे भुंग्यासारखे असतील. केस रेशमाचे लडीसारखे लांबसडक व काळेशार असतील. तिचा देह लवचिक आणि तरीहि भरदार असेल. आणि तिचा स्वर कांकणांच्या ध्वनीसारखा मंजुळ असेल. काय ही सारी केवळ माझी काल्पना होती ?

ह्या घराभोंवती घिरट्या घालणारा तो मघाचा तरुणहि काल्पानिक होता ? त्यानें ह्या घराच्या धन्याचे जें नांव सांगितले तेंहि काल्पनिक होते ?

उस्मानअली अकबरअली ! छेः—छेः ! ते नांव काल्पनिक नव्हते. पुन्हां एकदोन दिवसांतच मी त्या घरासमोर आलो, तेव्हां ह्या नांवा-विषयीं माझ्या कल्पना अधिक स्पष्ट झालेल्या होत्या. उस्मानअली अकबरअली हे प्रसिद्ध घराणें होते. ते घराणें हैदराबादचे होते. अनेक प्रकारचे व्यापार ह्या नांवावर चालत असत.

वृत्तपत्रांतून ह्या नांवाचे विज्ञापन मी पाहिलेले असते. रझाकारांना सहाय्य करणारा संशयींत म्हणूनहि ह्या सद्गृहस्थाचे नांव वर्तमान-पत्रांतून आलेले होते. अर्थात् सिद्ध कांहींच झाले नव्हतें. उस्मानअली व त्याची मालमत्ता सुरक्षित राहिली. ह्या देशांतील अनेक नगरांत उस्मानअलीची घरेंदारें होती. हे घरहि त्याचेच होते. आणि हें घर त्याचे होतें, हें बहुतेकांना ठाऊक नव्हते. ह्या घरांत तो कधीं येतो कीं नाहीं, ह्या घरांत नेहमीं कुणी राहते कीं नाहीं, कशाविषयींच कुणाला कांहीं ज्ञान नव्हते. जें कांहीं ज्ञान होतें, तें एका परक्या तरुणाला !

सर्व
ठिकाणीं
सर्व
प्रसंगी

लिहिण्यासाठीं प्लेटो पेन योग्य आहे.

म्हात्रे प्रॉडक्ट
plato



सुबक घडणीच्या
ह्या पेनचें नीब
मजबूत व दीर्घकाल
टिकणारें असून
लिहिते वेळीं
पेनमधून शाईचा संथ
व नियमित पुरवठा होतो.
४ रु. पासून २७.५०
पर्यंत विविध रंगांत मिळणाऱ्या
तऱ्हेतऱ्हेच्या प्लेटो पेन्सपैकीं
आपण कोणतेंहीं निवडूं शकतां.




सोल डिस्ट्रीब्युटर्स : **वेस्ट फाऊंटन पेन डेपो**, पो. बो. नं. २४२१, मुंबई - २.
Shilpi M.P.660 MAR.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मी त्या घराकडे पहात होतों व विचार करीत होतों. मी त्या घराकडे पहात होतों व अपेक्षा करीत होतों. मी अपेक्षा करीत होतों, कीं तो गोरा, कोमल हात मला कुठून तरी दिसेल. एखाद्या खिडकींतून, एखाद्या दारांतून, एखाद्या पडद्यांतून, माडीवर अथवा त्या उंच गच्चीवर तो हात तरी मला दिसेल, किंवा ती सबंध मुलगीसुद्धां मला दिसेल !—पण तसें कांहींच घडलें नाहीं ! गेले चारसहा दिवस मी त्या घरावरून सारखा चकरा मारीत होतों; पण तें घर तसेंच निःशब्द व निर्मनुष्य दिसत होतें. जणूं चुटपुटते दिसून गेलेले आपले रहस्य त्या घरानें पुन्हां पूर्णपणें गिळून व पचवून टाकले होते.—रहस्य ! खरेंच त्या घरांत कांहीं रहस्य होतें काय ? मी पाहिलेला हात खरोखरच एखाद्या मुलीचा होता काय ? तो हात एखाद्या मुलाचा कशावरून नसेल ! एखाद्या पोरसवदा, कोवळ्या मुलाचा ? तर मग त्या मोटारीभोंवतीं पडदे कां लागलेले होते ! आणि तो अनामिक तरुण ह्या घराभोंवती कां घोटाळत होता ?

[illegible] चार सहा दिवस मी प्रतिदिवशीं त्या घरावरून जात होतो. आणि त्या घराविषयीं विचार करीत होतो, माझा आता हा एक चाळाच बनला होता. मूर्खपणा ! कदाचित् मूर्खपणाहि असेल, पण येथें कांहीं विलक्षण घटना आकारास येत आहे, असें मला वाटत होतें. आणि प्रत्यक्षांत मला दिसत तर कांहीं नव्हतें. तो हातहि मला पुन्हां दिसला नाहीं, कुणी मुलगी दिसली नाहीं ! आणि अस्ताव्यस्त कपड्यांतला तो सुंदर तरुणहि मला दिसला नाहीं. मला दिसत होते केवळ ते दगडी घर आणि त्या घरावर एकाकीपणें उभी असलेली ती वेल. आणि तरीहि मी त्या घरावरून जातच होतो. कसल्यातरी अपेक्षा बाळगीतच होती. आणि त्या अपेक्षा विफल झाल्याचा अनुभव घेत होतो. आणि तरीहि माझ्या मनांतली अनामिक हुरहूर संपत नव्हती. त्या घरांविषयींची माझी ओढ ओसरत नव्हती. कितीतरी दिवस आणि दिवसांतला कितीतरी काळ मी त्या घरावरून फेऱ्या मारण्यांत घालविला. माझे हे फिरणें चारचौघांना चमत्कारिक वाटण्यासारखे आहे हेंहि माझ्या ध्यानांत आलें आणि मग मी त्या घरासमोरच असलेल्या सार्वजनिक उद्यानांत बसूं लागलों तरीहि मला विशेष व वेगळे कांहीं दिसे ना. हा वेडा उद्योग सोडून द्यावा, असेहि मला वाटूं लागले.

पण एके दिवशीं येथें जे मी पाहिले होते ते मला विसरतां येईना. सबंध एकदोन दिवस मी त्या घरावरून गेलो नाहीं. आणि मग अकस्मात् एके रात्रीं माझे पाय त्या घराच्या दिशेनें चालूं लागले. बोलपटाचा दुसरा खेळ पाहून मी बाहेर पडलो. आणि स्वतःला नकळतच त्या घराच्या वाटेला. लागला रात्रीचे बारा वाजून गेले होते. दुरून त्या घराचा तिसरा मजला मला दिसत होता. गच्ची दिसत होती. गच्चीखालूनच गेलेला सार्वजनिक मार्ग दिसत होता. व गच्चीकडील ती वेलहि दिसत होती. ती वेल तेथे अगदीं एकटी उभी होती. झाडाझुडुपांच्या जगापासून तिला जणूं वेगळी काढली होती. अन्य साऱ्या वेली धरित्रींत मूळ धरीत होत्या, व स्वैरपणें वाढत होत्या. त्यांची पाळेमुळें धरित्रींत मनःपूर्वक वाढत होती, व मन मानेल तितके पोषण तेथून घेत होती. त्यांच्या वाढीला कुठे मर्यादा नव्हत्या, सारी भूमी त्यांना मोकळी होती, त्यांच्या विस्ताराला मोकळी होती. पण ही बापडी वेल मात्र एका दगडाच्या कुंडीनें जखडलेली होती. त्या दगडानें तिच्या मुळांचा मार्ग जागोजाग अडविलेला होता. मोठ्या उल्हासानें वाढणारी तिची मुळें पुन्हां पुन्हां त्या दगडावर टकरा घेणार होती. व तेथेच त्यांची गति कुंठित होणार होती. मृदु मातींत अमर्यादपणें वाढत जाण्याचे स्वातंत्र्य त्या वेलीला नव्हते त्या दगडी कुंडीचा अगदीं संकुचित आकार, हेच तिचे सारे जग ! तेथे मावेल तेवढी मूठभर माती, हाच तिचा सारा आधार ! अगदीं खालीच पसरलेल्या अफाट धरणीशीं तिचा परिचयच नव्हता. कधीं परिचय होण्याचा संभवहि नव्हता. तिचे बीजारोपण झाले तेच मुळीं एका कृत्रिम, दगडी, मर्यादित जगांत ! बंधनातच ती जन्मली. व तेथेच ती मरणारहि होती. केवळ शोभेपुरतेच तिचे जीवन होते. त्या दगडी घराला स्वतःच्या देहानें शृंगारणें हेच तिचे कार्य होते. आणि एका अनैसर्गिक अधांतरी अवस्थेंतून ती खाली पसरलेल्या अफाट, भूमीकडे पहात होती. ती सीमाशून्य, सांद्र व सत्त्वपूर्ण भूमी हेच वस्तुतः त्या वेलीचे स्थान होतें. पण हे तिचे स्थान तिला कधीं मिळणारच नव्हतें. ह्या तिच्या अधिकाराच्या भूमीची व तिची गांठ कधी पडणारच नव्हती. त्या अनैसर्गिक पाषाणमय जगांतून ह्या सफल भूमीवर तिला कोण आणणार होते ! ती स्वतः अगदीं हतबल होती. तिला वेढून बसणाऱ्या दगडाशीं ती कुठवर झगडणार होती व तेथे ती कितीशी वाढणार होती ! बोलून चालून ती एक बंदिस्त अशी शोभेची वेल होती. तिनें विशेष वाढावयाचे नव्हतेंच. वरून ती पुन्हांपुन्हां छाटली जाणार होती. व खाली तिची मुळें अडणारच होती. ह्या मुर्दाड घराची शोभा वाढविण्यासाठीं असे मेलेलें जीवनच तिला जगायचे होते. पुन्हांपुन्हां कापली जाण्यासाठींच ती वाढत होती. तिचा तो वाढण्याचा व वर जाण्याचा प्रयास व्यर्थच होता.

—मी चालत होतो व त्या वेलीविषयींच मीं विचार करीत होतो. त्या वेलीकडेच मी पहात होतो. टिपूर चांदणे पडले होते व झाडांच्या छायेंतून मी चालत होतो. क्षणार्धांत कांहींतरी घडले. माझी विचारांची तंद्री मोडली. कुठे तरी दिव्याची गुंडी दाबली गेली, प्रकाशाचा एक झोत डोकावत नाहींसा झाला. त्या गच्चीवर त्या वेलीवर प्रकाश फाकून गेला. घराच्या जिन्यांतून तो प्रकाश आला होता. क्षणभर ती वेल दिसेनाशी झाली. मी डोळे मिटले व उघडले. शुभ्र चांदण्यांत उभी असलेली ती वेल मला आतां दिसत होती. आणि केवळ ती वेलच नव्हे, तर एक तरुण मुलीची आकृतीहि त्या शेजारीच उभी असलेली मला दिसत होती. त्या मुलीचा सारा वेष शुभ्र होता. जणूं चांदण्याच्या मुशींतून चांदण्याची मूर्तीच माझ्या डोळ्यांसमोर साकार झाली होती. मी डोळे चोळून पुन्हां पाहिले !—

प्रत्येक महाराष्ट्रीयानें संग्रही ठेवलाच
पाहिजे असा दीपावलीचा ऑगस्टचा क्रांतिकारक
अभिनव महाराष्ट्र विशेषांक
किं. १। रु.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भास ?–नव्हे–नव्हे ! माझ्या कल्पनेंतलं चित्रच सजीव होऊन माझ्यापुढें उभे होतें. मी स्तंभित होऊन झाडाच्या बुंध्याशीं उभा राहिलो. ह्या थंडीच्या रात्रीं, ह्या अशा अवेळीं, ही मुलगी तेथें काय करीत होती ?—मी पहात राहिलो. एखाद्या परीनें पंख पसरावा तसा तिचा शाल घेतलेला हात पुढें झाला. वेलीच्या फुलांची एक सपर्ण डहाळी खुडली गेली व कांहीं क्षणांनीं वाटेच्या दिशेनें फेकली गेली. आणखी एक डहाळी खुडली गेली व फेकली गेली. पुन्हां एकदां तीच कृती घडली. अपरात्रीं ही मुलगी फुलें खुडत होती व वाटेवर फेकत होती. काय तो केवळ एक चाळा होता ! मी न्याहाळून पहात होतो. गच्चीच्या खालीं त्या घराच्या आवाराची भिंत होती. व त्या भिंतीच्या छायेंतच ती फुलें पडत होती. आणि त्या छायेंतच एक काळी आकृती उभी होती. श्वास रोखून मी पहात होतो. ही काय एखादी अरबी भाषेंतील कहाणी प्रत्यक्षांत घडत होती ? पण तसाच कांहीं चमत्कारिक प्रकार घडत होता खरा. आतां दुसरी एक धिप्पाड आकृती चोर पावलांनीं त्या भिंतीच्या दिशेनें सरकत होती. ही आकृती माझ्या परिचयाची होती. चांदण्यांत ती मला स्पष्ट दिसत होती. ही त्या विक्राळ मिशांच्या सारथ्याची आकृति होती. एका निमिषांत ह्या राक्षसकाय माणसानें पुढें झेप घेतली. मिनीट दीड मिनीट निःशब्दपणें दोन माणसें झगडत होतीं. त्या झगड्याचा निर्णय तत्काल लागला. मोठी आकृति खोकत व धडपडत खालीं पडली व लहान आकृति झपाट्यानें धांवत सुटली. त्या धांवणाऱ्या आकृतीच्या अंगांत काळा वरकोट होता. चांदण्यांतून धांवणारी ती लहान आकृति मला परिचयाची वाटत होती. व आतां त्या लहान माणसाचा पाठलाग करीत धांवणारा भीमकाय पुरुष तर मी ओळखलाच होता. तीं दोन्हीं माणसें माझ्या डोळ्याआड झालीं व मी वर पाहिलें. आतां गच्चीवर कोणी नव्हते. आसमंतांत कोणी नव्हते. चोहोंकडे शुभ्र चांदणें पसरले होते व लांब कुठें तरी एकचा टोला पडत होता. बुद्ध्या मी त्या गच्चीखालील भिंतीखालीं गेलों. तेथें माणसांच्या पायांचे फरपाटे होते. चुकार एखादें पान होतें. तें पान त्या वेलीचें होतें. तेवढें तें एकच पान आपल्या जखडलेल्या जंगांतून खालच्या मोकळ्या सृष्टींत आलें होतें. ते पान तिनें टाकले होते, परंतु ती वेल मात्र अद्याप तेथेंच होती. ती अद्याप तशीच दगडानीं वेढलेली होती. भूमीच्या नैसर्गिक आश्रयापासून ती तशीच तुटलेली होती. तिच्या मुळाखालीं अमर्याद माती नव्हती. तर प्रस्तर होते व पोकळी होती. मातीवर नव्हे, पोकळीवर वाढणारी ती वेल होती.

त्या वेलीचा विचार करीतच मी घरीं परतलो, त्या वेलीचा व त्या मुलीचा वेगळा विचारच मी करूं शकत नव्हतो. त्या दोघी माझ्या दृष्टीनें आतां निश्चित एकरूप झाल्या होत्या. ती वेल जितकी खरी होती तितकीच ती मुलगीहि खरी होती. तिचे जे जिणे होते, तेच हिचेहि होते.

तिचे जिणे हिचे जिणे ! हिच्या जिण्याविषयी मला काय ठाऊक होते ! मी रात्रीं जे कांहीं पाहिलें, त्याचा काय अर्थ होत होता ! त्याला खरेच कांहीं अर्थ होता काय ? तो अर्थ शोधत पुन्हां दुसऱ्या दिवशीं सकाळींच मी त्या घरावरून फिरत होतो. आणि त्या घरावरून

## वाढत्या सांजवेळे



वाढत्या सांजवेळे
नये ग पाण्या जाऊं
भरल्या कळशीला
वेढिती शनिराहू

ढळते कासवशी
पायींची जड शिळा
पुजून पंचप्राण
कंठांत होती गोळा

पाण्यानें भिजे कटी
घामानें भिजे चोळी
भाळींचें भोळें कुंकूं
भिऊन आसूं गाळी

पेरीत गंध वेडे
चेटूक करी वारा
अंगांत यथा कोणी
छेडितो लक्ष तारा

पुरलें तुळशींत
होतें ग स्वप्न जागें
वैरिण पायवाट
ओढीते पाय मागें

काळोखीं चपापून
काढिते फणा शंका
स्वप्नींचा राजपुत्र
वारीत येतो पंखा

पाण्यानें होते आग
पंख्यानें होते लाही
नाहीं ग कधीं होत
जीव हा उतराई

फुटतो बाई घडा
संसारा जातो तडा
ओखटी वेळ मोठी
सोड हा छंद वेडा

—बा. भ. बोरकर

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तो पूर्वपरिचित तरुणहि फेरी घालत होता. त्याचे डोळे लाल झाले होते. व त्याच्या चेहऱ्यावर ओरखाडे उमटले होते. त्यानें मला ओळखहि दाखविली नाहीं. त्या घराकडे पहात आपल्याच धुंदींत तो निघून गेला. आणि तो तसा जात असतांच दाराच्या फाटकांतून दोन लाल डोळे त्याच्या मागोवा घेत होते. ते डोळे त्या काळ्यारोम सारध्याचे होते. त्याच्या उग्र काळ्या चेहऱ्यावरहि रक्ताळलेले ओरखडे होते. मी मनाशी हिशोब मांडत होतों. तर मग कालरात्रीं झोंबी झाली कुणाची ? ह्या दोघांची ? तो दुसरा तरूण मनुष्य होता तरी कोण ? ती मुलगी कोण होती ? उस्मानअलीची वहीण ? मुलगी ? तिचे ह्या तरुण माणसावर प्रेम होते काय ? त्यांची ओळख कुठें झाली ? कधीं झाली ? त्याच्या दिशेने ती केवळ फुलेंच फेकत होती काय ? कीं फुलांना बांधलेली एखादी चिठी ?

आणखी दोन रात्री मी त्या घराभोंवती फिरलों. आणखी दोन दिवस मी त्या घरावर पहारा दिला. पुन्हां सारी सामसुम झालेली दिसत होती. मला तो सारथी दिसला नाहीं. तो तरुण दिसला नाहीं. ती तरुणीहि पुनश्च गच्चीवर आलेली मी पाहिली नाहीं. ते उदास घर तेवढें मला दिसत होतें. व ती दुर्दैवी वेल दिसत होती. उस्मानअली अकबरअलीच्या दगडी घरावर सजलेली वेल. त्या वेलीं-शेजारीं ती मुलगी मात्र मला दिसेना आणि तिचा तर मी शोध घेत होतों.

—होय. उस्मानअली अकबरअलीला एक मुलगी होती. मात्र सायंकाळींच हैदराबादच्या एका जुन्या जाणत्यानें मला कांहीं गोष्टी सांगितल्या होत्या. उस्मानअली मोठा कटोर होता. मोठा कर्मठ होता. मोठा क्रूरकर्माहि होता. पण फार धूर्त होता. अनेक धंदे तो करीत असे. बायकांचा धंदाहि तो करीत असे. पण मोठ्या सफाईनं. अगदीं वरच्या पातळीवरून. त्याचें घर त्यानें त्या धंद्यापासून अलिप्त ठेवलें होतें. आपल्या मुलीस त्यानें मोठ्या करड्या जरबेंत ठेवलें होतें. त्याची मुलगी उस्मानिया विद्यापिठांच्या पडदे लावलेल्या वर्गांत कांहीं दिवस गेलेली होती. तिला तेथें पाठविण्यांतहि उस्मानचे उद्देश होते. वरच्या थरांतल्या कॉलेजांत शिकणाऱ्या मुलींचे वर्तूळ ओळखीचें व्हावें, त्यांचे आपल्या उस्मान-मंझील मध्यें येणें जाणें वाढावें असा हिशेब त्याच्या मनांत होता. पण त्याच्या हिशोबांत नसणाऱ्या कांहीं गोष्टी घडून गेल्या. हैदराबादेंत पोलिस कारवाई झाली. उस्मानिया विद्यापिठांतील एका तरुणा-विषयीं त्याच्या मुलीला अनावर आकर्षण उत्पन्न झालें. आणि मग तिची उचलबांगडी करण्यांत आली.

ऐकलेल्या ह्या साऱ्या गोष्टी मनांत घोळवीत मी झोपी गेलों; व पहाटे साडेतीनला दचकून जागा झालों. झोपेंतहि तें घर मला दिसत होतें, व पहिली जाग येतांच मी तडक त्या घराची वाट धरली. पहाटेचे साडेचार वाजले होते. ती वस्ती शांत होती. ते घर शांत होते. फिकट चांदण्यांत त्या वेलीची छायारेषा तेवढी कांपतांना दिसत होती. त्या वेलीच्या शेजारीं कोणीच नव्हतें. परंतु येथें काहीं घडून गेल्याचा भास मला होत होता. कांहीं काळ मी झाडाच्या छायेंत दबून उभा होतों. मग हळूहळू पावलें टाकीत मी त्या भिंतीजवळ गेलों. त्या गच्चीखालीं गेलों आणि माझ्या पायाखालीं काहीं पांढरे आलें. खिशांतली विजेरीचा प्रकाश मी भुईवर टाकला. भुईवर एक पांढराशुभ्र रेशमी रुमाल चुरगळून पडला होता. एक भेटचिठी फेकली गेली होती त्याला तिखटाची पूड सांडलेली दिसत होती. आणि काहीं अंतरावर एक मोठा भोपळ्याच्या आकाराचा दगड उलथून पडलेला होता. तो दगड कुणातरी शक्तिवान् माणसानें उंच उचलून फेंकलेला असावा. कारण त्या दगडानें भुईवर पाडलेली खांच स्पष्ट दिसत होती. त्या खांचेभोंवतीं पावलांची गिचमिड होती व भुईवर तुरळक पानें व फुलें सांडलेलीं दिसत होती. तो रुमाल व ती भेटचिठ्ठी मी घाईनें खिशांत घातली व चालूं लागलों.

चालतां चालतां मी एकदां मागें वळून पाहिलें. गच्चीवर ती वेल अद्यापहि केविलवाणा कंप भरल्यासारखी थरथरत होती. जें कांहीं झाले असेल, त्याची मी कल्पना करीत होतों. तो अज्ञात तरुण भिंती-खालीं आला. गच्चीवर ती तरुणी उभी होती. वरून फुलें टाकलीं गेलीं. आणि एका काळ्या धटिंगणानें त्याच सुमारास तो प्रचंड दगड उचलला. पडद्यांतल्या पाकसुरत परीला भुरळ घालणाऱ्याचा तो कपाळमोक्ष करणार होता. परंतु काळ आला असला तरी अद्यापि वेळ आली नव्हती. तो तरुण शेवटच्या क्षणीं सावध झाला. कदाचित् त्याच्या प्रेयसीनेंहि त्याला सावध केले असेल. तिखटाची पूड उधळली गेली.

थोडी झटापट झाली. आणि त्या झटापटींतच तो रुमाल व ती भेटचिठ्ठी खाली पडली.

—" सारा उस्मान " त्या पांढऱ्या शुभ्र रुमालावर काळीभोर रेशमी अक्षरे भरलेली होती. " सारा उस्मान !—" तर मग हा सारा उस्मानचा रुमाल होता ! उस्मानअली अकबरअलीच्या मुलीचा रुमाल !—आणि तिनें तो रुमाल कुणाला दिला होता ? मी घाईघाईनें खिशांतून ती भेटचिठ्ठी काढली व वाचली. " रेणुकादास अंबादास देशपांडे, एम्. ए. गोदापूरकर. "

निश्चित् हा मनुष्य हैदराबादचा होता. हैदराबादचा होता व मराठवाड्यांतला होता. " रेणुकादास " हे नांव मराठवाड्याविना अन्यत्र सहसा सांपडत नव्हते. तर मग सारा उस्मानला विद्यापीठां-तील ज्या तरुणाविषयीं आकर्षण उत्पन्न झाले होते, तो हाच तरुण ! कदाचित् तो तिच्या एखाद्या मैत्रिणीचा भाऊ असेल. कदाचित् तो मुलीसाठीं पडदानशील जागा ठेवणाऱ्या उस्मानिया विद्यापीठां-तला एखादा प्राध्यापक असेल. कदाचित् अन्य एखाद्या अपघाता-मुळें साराचा व रेणुकादासचा परिचय झाला असेल. पण साराच्या बापानें तिला येथें आणून बन्दिस्त केले, आणि रेणुकादास वेडापिसा होऊन तिच्या मागोमाग येथें आला तो तिच्या घराभोंवती फेऱ्या घालूं लागला. तिनें त्याला रुमाल दिला. तो रुमाल ह्या पहाटेच्या झटापटींत सांडला. निश्चित हा रुमाल शोधण्यासाठीं रेणुकादास परत त्या ठिकाणीं येईल. अगदीं अविलंबानें येईल. वाटेल तो धोका पत्करून येईल. आणि म्हणून मीहि तेथेंच जाणें योग्य होतें. रेणुकादास मला त्या गच्चीखालीं निश्चित् पुन्हां भेटला असता.

( पान १६ वर पहा )

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## देशीकार लेणी



# स्तोत्र कलाप

पं. महादेवशास्त्री जोशी

*स्तोत्र म्हणजे भारतीयांच्या भाविक जीवनांतील एक मोठाच विसावा—*

स्तोत्र म्हणजे एखाद्याची प्रशंसा अथवा स्तुतिपर पद्यरचना. हा शब्द 'स्तु' धातू पासून बनला आहे. ज्याच्या योगानें स्तविलें जातें ते 'स्तोत्र' एखाद्या देवतेचें छंदोबद्ध रूप-गुणकीर्तन म्हणजे स्तोत्र असा त्याचा विशेष अर्थ आहे. स्तोत्रांत देवतेच्या गुणकीर्तना बरोबरच स्तोत्र कर्त्याच्या प्रार्थनेचाहि समावेश होतो. देवता स्तुतिप्रिय असल्याचें मानलेलें आहे. म्हणून प्रथम उपास्य देवतेची भरघोस प्रशंसा करायची आणि त्याबरोबर हळूच आपली आकांक्षा किंवा कामना व्यक्त करायची, असा या स्तोत्रांचा थाट आणि घाट असतो.

स्तोत्र कल्पना फार पुरातन आहे. वैदिक काळांतच तिचा उगम झाला आहे. ऋग्वेदांतल्या प्रगीत ऋचांना 'स्तोत्रिय' म्हटलें आहे. स्तोत्र करणाऱ्या पुरुषाला 'उद्गाता' ही संज्ञा मिळाली आहे. स्तोत्रिय ऋचांचे तीन भेद आहेत—पुरोनुवाक्या, याज्या आणि शस्या. ऋग्वेदकालांत इंद्रादि देवतांच्या प्रसादाठीं सामुदायिक रीत्या आणि उच्च रवानें स्तोत्रें म्हटलीं जात. मधुच्छंदा ऋषि सांगतो—

**" आत्वेता निषीदतेन्द्र मभि**
**प्रगायत सखायः स्तोत्रवाहसः "**

मित्र हो, या. इथे बसा. तुम्ही सगळे स्तोत्र-गायनांत कुशल आहां. तेव्हां सगळे मिळून इंद्राप्रीत्यर्थ स्तोत्र म्हणा.

स्तोत्र ही एक पवित्र शक्ति आहे. स्तोत्राच्या सामर्थ्यानें स्वर्गातले देव मानवांच्या यज्ञस्थला-कडे आकृष्ट होतात. स्तोत्रमंत्रांनीं देवांचें बल वाढतें, उत्साह वाढतो आणि त्यामुळें स्तोत्र-कर्त्या यजमानाचें अभीष्ट सिद्ध होतें. शत्रू, व्याधी, राक्षस आणि पातकें यांच्यापासून बचाव व्हायला हवा असेल, तर स्तोत्राचा अवलंब करावा. स्तोत्राविषयीं वैदिकांची धारणा अशा प्रकारची होती.

ऋग्वेदांत स्तोत्रमहिमा वारंवार वर्णिलेला आहे. 'स्तोत्रानें इंद्र भीमकाय बनून द्यावा–पृथिवींना व्यापतो.' सूर्याला स्वर्भानूनें ग्रासलें होतें, तर अत्रीनें स्तोत्राच्या बळावर त्याला मुक्त केलें. ज्याला स्तोत्र उत्तम करतां येतें, तो भक्त देवांचा लाडका बनतो. तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यांत मूर्धाभिषिक्त ठरलेला 'ब्रह्म' हा शब्द प्रथम स्तोत्रवाचकच होता. स्तोत्ररूप काव्याला वैदिक ऋषी ब्रह्म म्हणत. 'विश्वामित्राचे ब्रह्म म्हणजे देवतास्तोत्र भारतीय जनांचें संरक्षण करतें,' अशा अर्थाचा एक मंत्र ऋग्वेदांत आहे. त्या काळच्या पुरोहितवर्गाची श्रेष्ठता या स्तोत्रशक्तींतच होती. म्हणूनच त्या वर्गालाहि 'ब्रह्म' म्हणूं लागले. त्यावरूनच ब्राह्मण शब्द बनला. एवंच वैदिकांनीं स्तोत्र म्हणजे एक गूढ शक्ति आहे, असेंच मानलें.

संस्कृत साहित्यांत स्तोत्रांचा भरणा फार मोठा आहे. शिव, विष्णु, सूर्य, देवी, गणपति इत्यादि सर्व देवतांचीं अनेक स्तोत्रें आहेत. देवांचीं विविध रूपें तशीं विविध स्तोत्रें. शिवानें तांडव सुरू केलें कीं 'शिवतांडव स्तोत्र' बनलें. तो दक्षिणामूर्ति बनला कीं त्या नांवाचें स्तोत्र तयार. देवी जगन्माता असेल तेव्हां स्तोत्र वेगळें. ती त्रिपुर सुंदरी बनली कीं स्तोत्र वेगळें. शैव, वैष्णव इत्यादि संप्रदायांच्या उपासनपद्धतींत स्तोत्रांना विशेष महत्त्व दिलें गेलें आहे. स्तोत्रपाठ हा सामान्यतः सार्वप्रार्थनेच्या रूपानें होत असतो.

भगवान् आद्य शंकराचार्यांनीं कित्येक स्तोत्रें रचलेलीं आहेत. तीं जितकीं प्रसन्न तितकीच मधुर आहेत. आचार्यांच्या भावार्द्र अंतःकरणाचा मनोरम आविष्कार त्यांच्या स्तोत्रांतच पहायला सांपडतो. त्यांची तर्ककठोर आणि प्रतिपक्षावर चौफेर आक्रमण करणारी वाचाशक्ति स्तोत्रप्रांतांत उतरतांना अमृताच्या कल्लोळांनीं न्हाऊन आलीं आहे. मृदु आणि रसाळ बनली आहे. त्यांच्या 'षट्पदी' स्तोत्रांतला पुढील श्लोक पहा—

**" सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं**
**न मामकीनस्त्वम्**
**सामुद्रो हि तरंगः क्वचन**
**समुद्रो हि तारंगः "**

जीव-ब्रह्माचें ऐक्य झालें. तुझ्या माझ्यांतला मी-तूंपणाचा भेद निरस्त झाला. तथापि हे प्रभो ! तूं, मी एकाकार, एकरस असलों तरी मी तुझा आहें. तूं माझा नव्हेस; समुद्र आणि तरंग हे जलरूपानें अभिन्न खरे. पण तरीहि तरंग हा सागराचा असतो. सागर कधी तरंगाचा होत नाहीं.'

शिवमहिम्नः स्तोत्र आणि रामरक्षा हीं भारतांतलीं अत्यंत लोकप्रिय स्तोत्रें होत. लक्ष-कोटी कंठांतून आजवर तीं उद्घोषिलीं

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गेलीं आहेत आणि त्यामुळेंच त्यांना तारक मंत्राचें स्वरूप लाभलें आहे. पुष्पदंत हा महिम्नस्तोत्राचा कर्ता. त्यानें भक्तिसांद्र मनानें पत तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरून शिवमहिमा गायिला आणि अंतीं हात टेकून म्हटलें—

'समुद्राएवढी दौत. काजळाचा पर्वत पीटून केलेली शाई. कल्पतरूची लेखणी. हें विशाल भूपृष्ठ हाच कागद. एवढें सगळें साहित्य जमवून साक्षात् सरस्वती जरी लिहायला बसली, तरी तुझें माहात्म्य लिहून संपणार नाहीं...'

रामरक्षेचा कर्ता बुध कौशिक. तें स्तोत्रहि आहे, अन् त्याचबरोबर कवचहि आहे. कवच हा स्तोत्राचाच एक वेगळा प्रकार. कवच म्हणजे चिलखत. तें चढवून रणांगणांत उतरायचें हें युद्धशास्त्र. जीवन हें युद्ध नसलें तरी तो एक अज्ञात असा दीर्घ प्रवास आहे. त्या प्रवासांत ज्ञाताज्ञात शत्रूंचे तडाखे आणि दुर्दैवाचे आघात सोसण्याची पाळी येते. कित्येकदां माणूस उरीं घाव लागून पडतो, कोसळतो. अशा वेळीं काय करावें तर ईश्वराच्या नामांचें कवच चढवावें. म्हणजे मग भय नाहीं. अशा दृढ श्रद्धेतून या कवचांची निर्मिति झाली आहे. प्रत्येक देहावयवाला देवाच्या एकेका नामाचें कवच. त्या बुध कौशिकानें निर्मून दिलें आहे—

**"शिरो मे राघव:**
**पातु भालं दशरथात्मजः**
**कौसल्येयो दृशौ पातु**
**विश्वामित्रप्रियः श्रुती"**

माझें मस्तक राघवानें रक्षावें. भालप्रदेश दशरथाच्या पुत्रानें सांभाळावा. कौसल्यानंदनानें माझी दृष्टि शाबूत ठेवावी. विश्वामित्राच्या लाडक्यानें माझीं श्रवणेंद्रियें रक्षावी...

मराठी भाषेंतलीं दोन सुप्रसिद्ध स्तोत्रें म्हणजे 'भीमरूपी' आणि व्यंकटेशस्तोत्र हीं होत. समर्थ रामदास हे पहिल्याचे जनक. 'भीमरूपी' म्हणजे बजरंग बली! त्या स्तोत्रांत मारुतीच्या भीम पराक्रमांचें उडतें उच्चंबळतें वर्णन आहे. भाषा खडबडीत; पण आवेशयुक्त.

**"ठकारे पर्वताऐसा**
**नेटका सडपातळ**
**चपळांग पाहातां**
**मोठें महाविद्युलतेपरी**
**कोटिच्या कोटि**
**उड्डाणें झेपावे उत्तरेकडे**
**मंदराद्रीसारिखा द्रोण**
**क्रोधें उत्पाटिला बळें"**

हा त्याचा नमुना समग्र स्तोत्र एका दमांत म्हटलें कीं काळजांत कांहीं निराळीं स्पंदनें जाणवतात. दंड थोपटावा असें वाटतें. 'मारुतीच्या प्रसादानें भुक्ति मुक्ति सदा वसे' अशी जरी त्याची रोचक फलश्रुती समर्थांनींच सांगितली असली, तरी त्यांचा पोटांतला हेतु जनमनांत वीरश्रीचा संचार व्हावा, हाच आहे. तें खरें उत्थापनस्तोत्र आहे.

याच्या उलट देवीदासाचें व्यंकटेशस्तोत्र. तें ओवीबद्ध असून ओवीसंख्या १०८ आहे. हें स्तोत्र रचतांना आणि त्यांतून व्यंकटेशाला आळवतांना कवि स्वतःच एखाद्या आपत्तींतून जात असावा, कसल्यातरी प्रापंचिक यातनांनीं व्यथित असावा असें वाटतें. 'अन्नासाठीं दाही दिशा। आम्हां फिरविसी जगदीशा' या ओवीवरून तो कदाचित् दारिद्र्यानेंहि गांजला असावा अशी शंका येते. पण त्यानें जें निर्मून ठेवलें आहे, तें मात्र अति हृदयंगम आहे. आर्त भक्तीचा तो एक सुंदर नमुना आहे. प्रथम लीन भाव दर्शवून तो 'धांव पाव रे गोविंदा' म्हणतो. मग देवाची श्रीमूर्ति आपाद मस्तक भावदृष्टीनें न्याहाळतो. मग तिची षोडशोपचार मानस पूजा आरंभितो. आणि इतकें सगळें झाल्यावर मग आपली प्रार्थना हळूंच देवाच्या कानीं घालतो.

**"सरळ सुंदर नासिक। जेथे पवनासि झालें सुख। गंडस्थळींचें तेज अधिक। लखलखीत दोहीं भागीं॥**
**त्रिभुवनींचें तेज एकवटलें। बरवेपण सिगेसि आलें। दोही पातयांनीं धरिलें। तेच नेत्र श्रीहरीचे॥**
**व्यंकटा भ्रुकटिया सुनीळा। कर्णद्वयाची अभिनय लीळा। कुंडलाच्या फांकती किळा। तो सुखसोहळा अलोकिक॥"**

असा हा जगजेठी आपल्या भक्तिस्तव सगुणरूप झाला, अशी देवीदासाची श्रद्धा आहे. देव जणूं आपल्या समोर सिंहासनावर विराजित झाला आहे अन् आपण त्याला गाऱ्हाणें सांगत आहों, अशा थाटांत तो बोलला आहे. एवंच भक्त-भाविकांच्या हृदयाला ओलावा आणि आश्वासन देईल, असेंच हें आमूलाग्र स्तोत्र आहे. स्तोत्रवाङ्मयाचें हें 'देशीकार लेणें' आहे.

स्तोत्र म्हणजे अंतरींचा उमाळा. स्तोत्र म्हणजे देवापुढे मन मोकळें करणें. स्तोत्र म्हणजे आत्मनिवेदन. स्तोत्राचें हें स्वभावसामर्थ्य लक्षांत घेऊनच भारतीय संस्कृतीनें त्याला उपासनेचें एक श्रेष्ठ साधन मानलें आहे.

• •

---

( पान १४ वरून चालू )

—आणि खरोखरच तसे झाले. पहाटेच्या पहिल्या प्रकाशांत त्या गच्चीखालीं रेणुकादासची आकृति मला दिसली. त्याच्या अंगावर काळा वरकोट होता. आणि खाली वाकून भुईवर तो कांहींतरी शोधत होता.

"रेणुकादास देशपांडे" जवळ जाऊन मी त्याना हांक मारत म्हणालों, "तुमचं कांहींतरी हरवलं आहे खरं ना!"

रेणुकादास कांहींच बोलत नाहीं. त्यानें माझ्याकडे केवळ पाहिले. त्याच्या त्या दृष्टींत निषेध होता, वेदना होती, ताण होता व विनवणीहि होती.

रेणुकादासचे बोलणे ऐकण्याची वस्तुतः मला फार इच्छा होती. परंतु एक शब्दहि बोलण्याची त्याची इच्छा दिसत नव्हती. त्याचे लाल व पाणावलेले डोळे लकाकत होते व त्याचे ओठ व चेहरा टवटवत होता. तुसत्या कुतुहलापोटीं त्याचा अधीक अंत बघणें मला क्रूरपणाचें वाटलें. मुकाट्यानें साराची नामाक्षरें असलेला तो रेशमी रुमाल मी रेणुकादासच्या वरकोटांत सरकावला व एखाद्या झोपलेल्या माणसाप्रमाणें रेणुकादास चालूं लागला. त्याचा हात वरकोटांतील त्या रुमालावर होता व त्याची दृष्टी वर होती. त्या गच्चीकडे, त्या वेलीकडे. क्षणापूर्वी त्या वेलीपाशीं कोणी नव्हतें. पण क्षणांत त्या वेलीशेजारीं एक चेहरा दिसूं लागला. काळ्याभोर डोळ्यांचा, पिवळ्या गोऱ्या वर्णाचा, अठरा एकोणीस वर्षांच्या मुलीचा

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बदामी चेहरा. तो चेहरा बावरलेला होता, उत्तेजीत होता, व्याकुळ होता. जणूं त्या मुलीला कांहीं बोलायचें होतें उंच-स्वरांत चित्कार करून काहीं सांगावयाचें होतें. दिवसाच्या उजेडांत आज प्रथमच मी हा चेहरा तेथें पहात होतों. रेणुकादास तर काहीं अंतरावर जागच्या जागीं खिळला होता. व एखाद्या गुंगलेल्या माणसाप्रमाणें त्या मुलीकडे पहात होता. त्या मुलीनं एकहात वेलीवर ठेवला होता. व दुसराहात आपल्या वक्षस्थळावर ठेवला होता. तिची छाती धपापत होती, व तिचे ओठ विलग होत होते. खरोखर तिला काय झाले होतें ? ह्यावेळी ती तेथें कां आली होती ? कांहीं कारण अवश्य असलें पाहिजे. काहीं फार बलवत्तर कारण असले पाहिजे. आणि ह्या विचारासरशीं सावध होऊन मी मागें वळून पाहिलं. आणि माझ्या डोळ्यानां एक भयप्रद दृश्य दिसलं, माझ्या कानावर एक भयप्रद ध्वनी आदळता, हिरव्या रंगाची एक गाडी तुफान वेगानें धांवत येत होती. आणि वाटेच्या जवळ-जवळ मध्यावर रेणुकादास उभा होता. त्या गाडीचा सारथी तोच विक्राळ मिशांचा राक्षस होता. गाडीचा मार्ग तो बदलत नव्हता कीं गाडीची गती कमी करीत नव्हता. रेणुकादासच्या दिशेनेंच सरळ तो वाऱ्यासारखा येत होता.

" रेणुकादास " कोरड्या पडणाऱ्या कंठानें मी ओरडलों, "रेणुकादास. " पण रेणुकादासला कशाची शुद्धच नव्हती. तो त्या वेलीकडे पहात होता. तो त्या मुलीकडे पहात होता आणि त्या मुलीचा चेहरा विवर्ण झाला होता. वेलीवर हात ठेवून ती गच्चीच्या कठड्यावरून वांकत होती. आणि ती आपला पंजा हलवीत होती.

पण रेणुकादास जागचा हलत नव्हता. ती गाडी आतां माझ्यापासून फारच जवळ होती. आणि रेणुकादासापासून फारशी दूर नव्हती. " रेणुकादास " मी पुन्हां ओरडलों व त्या गाडीशीं पैज लावून धांवत सुटलों. अगदीं अखेरच्या क्षणीं मी रेणुकादासला कडेला खेंचलें. ती गाडी जवळजवळ मला चाटून सुसाट वेगानें पुढें गेली. त्या भंगलेल्या विफळांतहि त्या गाडीच्या सारथ्याचा चेहरा मी पाहिला. त्याच्या चेहऱ्यावरील खुनशी भाव पाहिले. त्याचे एखांद्या पशूसारखे पांढरे बळकट खिचकले जाणारे हात पाहिले. पण रेणुकादासनें मात्र जणूं कांहींच पाहिलं नाहीं. अद्यापहि तो त्या वेलीच्या दिशेनेंच पहात होता. तेथून ती मुलगी जणुं अगदीं निर्वाणीच्या दृष्टीनें रेणुकादासकडे पहात होती माझ्याहि बाजूनें तिनें एकदां दृष्टी वळविली. जणू ती मला मनःपूर्वक धन्यवाद देत होती. जणू ती मजपाशीं कांहीं याचना करीत होती. रेणुकादासनें आतां तेथें थांबण्यांत कसलें संकट आहे, ह्याची जणूं ती त्याला व मलाहि सूचना देत होती. पण कसलींहि सूचना घेण्याच्या अवस्थेंत आज रेणुकादास नव्हता. तो आतां अगदीं निकरावर आला होता. त्याचा तो वेडा उमाळा पाहून तिलाहि उचंबळून आले. कठड्यावरून ती वांकू लागली अधिक वांकू लागली—तिच्याबरोबर ती वेलहि वांकू लागली, आणि मग रेणुकादास सावध झाला. एका चालत्या रिक्षांत त्यानें उडी घेतली. तो दिसेनासा झाला. तीहि दिसेनाशी झाली. आतां केवळ तेथे ती वेल दिसत होती.

## या महिन्यांतील गाजलेली व्यक्ति : ' मॅन्नम '



८२ वें वयाचा हा वृद्ध नायर पुढारी' नांव ' मन्नाथ पद्मनाभन् ' पण केरळांत त्याला ' मॅन्नम् ' याच नांवानें ओळखतात. आज केरळमधील सरकारविरोधी चळवळीचा मुख्य सूत्रधार म्हणून तो राजकीय रंगभूमीवर पदार्पण करीत आहे.

कारण मन्नाथची सारी हयात राजकारणांतच गेली. केरळांत स्टेशनवरचे हमालहि अस्खलित इंग्रजी बोलतात असा खराखोटा लौकिक आहे पण केरळच्या शैक्षणिक चळवळींत अग्रभागीं असणाऱ्या पुढाऱ्यानें इंग्रजी शिकण्याची काळजी घेतली नाहीं. ' मॅन्नम् ' चा मूळचा पेशा शिक्षकाचा. नायर जमातीच्या उद्धारासाठीं नायर सर्विस सोसायटी नांवाची संस्था त्यानें स्थापन केली. या संघटनेचा रोख कॅथॉलिक विरोधी असल्यामुळें तत्कालीन त्रावणकोरचे दिवाण श्री. सी. पी. रामस्वामी अय्यर यांनीं ' मॅन्नम् ' ला उचलून धरलें आणि त्याचा दृश्य परिणाम म्हणजे त्रावणकोरमध्यें शाळांचे जाळेंच पसरलें.

पुढें कॉंग्रेसच्या झंझावातासमोर मॅन्नमची संघटना आणि त्याची वैयक्तिक लोकप्रियता ओसरली. त्यामुळें त्यानें कांहीं काळ कॉंग्रेस आणि नंतर हिंदुमहासभेशीं जुळतें घेण्याचा यत्न केला. पण दोघांशीहि न जुळल्यामुळें त्यानें पुनरपि आपल्या जातीय संघटनेचा आश्रय धरला.

मॅन्नमचा चेहरा मुसोलिनीच्या वळणाचा आणि वक्तृत्व तुफानी व हृदयाला पीळ पाडणारें आहे. शैक्षणिक चळवळीनंतर त्याच्या जिवाचा एकुलता एक विसावा म्हणजे त्याची मुलगी.

आज केरळच्या शैक्षणिक रंगभूमीवर मॅन्नम परत येत आहे. आणि आपल्या जन्मजात शत्रूंशीं हातमिळवणी करून त्यानें ही संधि साधली आहे.

• • •

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्या वेलीचा विचार करीतच पुन्हां एका पहाटे मी त्या घराची वाट चालत होतो. त्या वेलीचे हे जीवन खरोखर कष्टमय होते, त्या मुलीचे जीवनहि दुःखमय होते. कोंडलेले होते. गुदमरलेले होते. कुंठित होते. कुचंबलेल्या कुंडीत कोणी वेली लावाव्यात काय ? वेलींनी स्वैरपणे वाढायचे असते. त्यासाठीं त्या भूमीवर वाढल्या पाहिजेत. मोकळ्या जगांत जगल्या पाहिजेत. येथे त्या मनसोक्त विस्तारल्या पाहिजेत. त्या कुंडीतहि ती वेल जगत होती. पण ते जगणे किती कष्टाचे होते, किती अनैसर्गिक होते. अन्य वेली भूमीवर वाढत होत्या. स्वैरपणें विस्तारत होत्या. आणि स्वैरपणें वाढण्यासाठींच परमेश्वरानें वेली निर्माण केल्या नव्हत्या काय ? तो त्यांचा अधिकारच नव्हता काय ? तोच त्यांचा स्वभाव नव्हता काय ? तर मग एखाद्या वेलीला अगदीं अस्वाभाविक जगांत कोंडून ठेवणें किती क्रूरपणाचे होते ? अनंत आकाशांत विहार करण्यासाठीं जन्माला आलेल्या पांखराला पिंजऱ्यांत कोंडून ठेवण्यासारखेंच ते नव्हते काय ?—छेः छेः ! ती वेल पिंजऱ्यांत कोंडलेली होती. ती मुलगीहि पिंजऱ्यांत कोंडलेली होती. एका कठीण दगडी पिंजऱ्यांत ! तेथून त्या वेलीची कधीं सुटका होईल काय ? तेथून त्या मुलीची कधीं सुटका होईल काय ? काय रेणुकादास ह्या मुलीला नवे जीवन देईल ? तो तिची सुटका करील ? आणि मुक्त झालेली ती मुलगी त्या वेलीलाहि मुक्त करील कां ? रेणुकादासच्या घरांत आणि आंगणांत मग त्या दोघीहि स्वैर आनंदानें वाढतील काय ? हे असे कधीं होईल काय ?

—ते घर, आतां हे एवढें वळण घेतले कीं पलीकडेच होते. आणि तेथें ती वेल होती व तेथें ती मुलगीहि होती. एकरूपतेनें त्या दोघीहि माझ्या डोळ्यांना मूर्तिमंत दिसत होत्या. लवचिक वेलीसारखी ती मुलगी व मनोहर मुलीसारखी ती वेल ! त्या दोघींनाही मी मनोमन पहात होतों.

—आणि मग तेवढ्यांत माझ्यासमोर दुचाकी नांवाचे एक लोखंडी यंत्र खडखडत आलें. त्या दुचाकीला दुधाचें डबे टांगलेले होते. त्या दुचाकीवरील फेटा बांधलेला बाप्या मला पाहतांच धांपा टाकत खालीं उतरला व चमत्कारिक स्वरांत म्हणाला, " महाराज, जरा तिकडे चला तिकडे ! "

" तिकडे कुठें ? " मी विचारले.

" त्या तिकडे. " त्या घराच्या दिशेनें सर्वसामान्यपणें बोट दाखवीत तो म्हणाला, " तिथें बघा काय झालें आहे तें ! '

आम्ही दोघेहि झपाझप चालूं लागलों. पहांटेच्या क्षीण चांदण्यांत आम्हां दोघांच्या सांवल्या सरकत होत्या. अनेक अभद्र कल्पना माझ्या मनांत गर्दी करीत होत्या. निश्चित काय झालें तें विचारण्याचाहि मला धीर होईना. सारे मार्ग निर्मनुष्य होते. केवळ आम्हां दोघांची पावलें तेवढी वाजत होती- व त्या दूधवाल्याची सायकल कर्कशपणें खडाडत होती. तो ध्वनीहि मला सहन होईना. मला पहावयाचें तरी काय आहे ? हेहि मला कळत नव्हते, माझा मार्गदर्शक मला त्या घरच्या दिशेनेंच नेत होता. मी भयग्रस्त मनाने पहात होतो. मला त्या घराची गच्ची दिसूं लागली. ओळखीची असूनहि ती गच्ची मला अनोळखी वाटत होती. ती उदास गच्ची आतां अधिकच उजाड व ओकीबोकी दिसत होती. तेथून कांहीं तरी उणे झाले होते; ती परिचित व सुंदर वेल मला आतां तेथे दिसत नव्हती.

" हे काय झाले ! "

घोगऱ्या स्वरांत मी ओरडलो. माझे शब्द स्पष्ट उमटले नव्हते. माझ्या सोबत्यानें एकदां माझ्याकडे पाहिले, व कपाळांवरील घाम निपटत दम छाटत तो म्हणाला " काय झाले. ते मला नीट समजलं सुद्धां नाहीं. त्या भिंतीखालून एक माणूस जात होता. त्याच्या मागून हळूहळू दुसरा एक दांडगा माणूस येत होता. वर त्या गच्चीवर एक मुलगी फुल तोडत होती. ती पडली. एकदम धाडकन् त्या खालच्या माणसाच्या अंगावर पडली. कशी पडली, काय पडली सांगता येत नाहीं. ती पहा ती दोघहि तिथं पडली आहेत. जरा पहा तर... "

मी पहात होतो.

ती दोघहि तिथ पडली होती. परस्परांशेजारीं ती जणू झोंपी गेली होती. ती त्याच्या कुशींत होती आणि त्याचा हात तिच्या अंगावर होता. आणि त्या दोघांच्याहि अंगावर त्या गुलाबी फुलांनी बहरलेल्या हिरव्यागार वेलींचें अच्छादन झाले होते, जणूं त्या वेलीची चादर पांघरून ती दोघेहि तेथें झोंपी गेली होती. त्या वेलीची फुले त्यांच्या अंगावर व अंवती भोंवतीहि विखुरली गेली होती. आणि फुलांच्या पानांच्या व मातीच्या बिछान्यावर ती दोघे झोंपली होती. कुंडी फोडून कुंडीतली ती वेल अखेर धरणींखाली आली होती.

मी पहात होतो.

कुठून कोण जाणे पण माणसे गोळा झाली होती व माणसे गोळा होत होती. गोळा झालेली माणसे बोलत होती. हा मोठा विलक्षण अपघात आहे असे कुणीतरी सुचवीत होते. फुलें तोडतां तोडतां ती वाकली व तिचा तोल गेला. पडतां पडतां तिनें त्या वेलीचा आधार घेतला, व वेलीसकट ती खालीं आली. आणि ती खाली आली, ती नेमकी त्या अभागी तरुणाच्या अंगावर पडली. दोघांनाहि मुका मार बसला आणि दोघेहि प्राणास मुकली. आसमंतात कुठे रक्ताचा थेंब नव्हता ! नुसती फुलांची पखरण होती. मोठा विलक्षण अपघात !

—अपघात ! खरोखरच तो अपघात होता काय ! कीं रेणुकादास तेथे आला आणि त्याच्या पाठोपाठ एक सशस्त्र मारेकरीहि तेथे आला ! सारानें ते पाहिले ! सारनें रेणुकादासला सावध करण्याचा प्रयत्न केला ? तो प्रयत्न विफल झाला ? आणि मग सारानें खाली उडी घेतली. त्या मारेकऱ्याच्या अंगावर कीं केवळ आत्मघातासाठीं ! आणि ती उडी झेलण्याचा प्रयत्न रेणुकादासनें केला काय ! आणि म्हणून त्या दोघांचीहि उडी मृत्यूच्या राज्यांत पडली काय ! निश्चित झाले तरी काय ?

—निश्चित काय झालें ते आतां कुणालाहि सांगतां येणार नाहीं. परंतु जे कांहीं घडले ते केवळ अपघातानें घडलें ह्यावर माझा विश्वास बसत नव्हता. सारा किंवा रेणुकादास ह्यांपैकीं कुणालाहि मीं ओळखला नव्हता. त्याची जीवनकथा मला ठाऊक नव्हती. आणि तरीहि मला वाटत होते कीं ह्यांची जीवनकथा माझ्या परिचयाची आहे. ह्यांची प्रेमकथा माझ्या परिचयाची आहे. त्या प्रेमाचा प्रारंभ आणि परिणामहि माझ्या परिचयाचा आहे. त्या अतृप्त पण अविनाशी प्रेमाचा विचार करीतच मी सारा व रेणुकादासच्या शरीराकडे पहात होतों, त्या शरीरांना शोभा देणाऱ्या वेलीकडे पहात होतों. व एकेकाळीं त्या वेलीला स्वतःशीं जखडून ठेवणाऱ्या त्या उद्विग्न. दगडी घराकडेहि पहात होतों.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

प्रवास—वर्णन

निसर्गाच्या प्रत्येक लोकविलक्षण घटनेंत भुतेखेतेंपिशाच्चें शोधणारी जपान्यांची वृत्ति आणि किडीनें पोखरलेल्या फळीवर स्थलचित्र निर्माण करण्याची कलात्मक वृत्ति—या दोहोंत कांहीं नजिकचें नातें आहे काय ?

—प्रभाकर पाध्ये

# धा धा

'कम् मॉन्—आयूइल शो यू ए फेमस स्पॉट.'

—यावातानोला जातांना रस्त्याकांठच्या एका रेस्टोरॉंमध्यें आम्ही चहा पीत बसलों होतों तेव्हां पासीन म्हणाला.

मी लगेच उठलों. जें जें पासीन दाखवील तें तें मला पाह्यचेंच होतें. जपानचीं रम्य सौन्दर्यस्थळें, कलासुंदर घरें, आतिथ्यशील माणसें, जें जें पाह्यला मिळेल तें तें पाहण्यास मी



उत्सुक होतों. त्यासाठीं तर मी यावातानोच्या जत्रेला चाललों होतों. आमचें रेस्टोरॉं समुद्र-कांठच्या एका टेकडीच्या टोकावर होतें. त्याच्या पिछाडीस एक छोटीशी बाग होती. त्या बागेंत नेऊन पासीन म्हणाला, "पाहा."

समोरचें दृश्य खरोखरीच विलक्षण होतें. एक कभिन्न कराळ कडा—उभाच्या उभा ! त्याचें काळेंकुट्ट खडकाळ अंग दुपारच्या तिरप्या उन्हांत तकाकत होतें. त्याच्या कपारीचीं अणकुचीदार टोंकें मगरीच्या दाढांसारखी इतक्या दुरूनसुद्धां डोळ्यांना खुपत होतीं. समुद्रापासून सुमारें तीसचाळीस फुटांवर तो कडा एकदम उचलला होता आणि त्याच्या खालीं वेडकाच्या तोंडाच्या आकाराची एक अभद्र भयाण घळ निर्माण झाली होती. घळीच्या तळाचा काळा कुळकुळीत कातळ बाहेर येऊन पसरला होता आणि त्याच्यावर दहावीस शिळा—अफाट आकाराच्या—अस्ताव्यस्त पसरल्या होत्या. त्यांतली एक, विशेष आक्रस्ताळी आपल्या खबदडित अंगाच्या कडा, फरशीच्या पात्याप्रमाणें परजून जो येईल त्याला सरळ चिरण्यासाठीं सज्ज होती. मला एकदम ती जपानी लोककथा आठवली. सृष्टीच्या प्रारंभीं वादळदेव सुसानोवो संतापला आणि त्यानें जगावर विनाशाचा वर्षाव केला—तेव्हां त्यानें फेंकलेल्या दरडींपैकीं ही एक अस्सल आजतागायत हजर होती. मी तिकडे थोडें निश्चल नजरेनें पाहण्याचा प्रयत्न केला. समुद्राच्या सुसाट लाटा या शिळांवर फुटत होत्या आणि त्यांचें फेसाळलेलें भ्रमिष्ट पाणी त्या घळींत एकादी चवताळलेली नागीण खन्दाडींत घुसावी तसें घुसत होतें. माझे डोळे फिरताहेतसें वाटलें.

मी एकदम नजर फिरविली आणि जरा बाजूला गेलों. मात्र दृष्टि त्या खडकाकडेच वळली. पण आमच्या टेकडीवरचें एक चिडाचें झाड आतां मध्यें आलें. समुद्रावरच्या पिसाट वाऱ्यानें त्याचा वक्र विस्तार चांगलाच झोडपला होता. त्याच्या फांद्या पिळवटल्या होत्या आणि सळयांचे झुपके विस्कटले होते. त्या झाडाला जखिणीचें रूप आलें होतें. मी नीट न्याहाळून पाहिलें. त्या झाडाच्या विपरीत विस्तारांतून ती शिळा फारच भयंकर दिसली.

पासीन म्हणाला, 'हें ठिकाण आत्महत्येसाठीं प्रसिद्ध आहे. समोरच्या कड्यावरून शरीर झोकून दिलें कीं चूक म्हणून व्हायची नाहीं. प्रथम तें त्या उचललेल्या भागावर अलगत आदळेल आणि मग त्या शिळेवर अचूक फेंकलें जाईल—मग त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडायला किती वेळ !'

त्या नुसत्या कल्पनेनें माझें डोकें सुन्न झालें. पण पासीन या ठिकाणाला चांगला सरावलेला असावा. शेजारी एक जपानी उभा होता त्याच्याशीं तो मोकळ्या आवाजांत

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बोलूं लागला.

जरा वेळानें मला म्हणाला, 'हा जपानी गृहस्थ सांगत होता—गतवर्षी एका मातबर घराण्यांतील मुलीनं आपल्याला आपल्या एटा प्रियकराशीं लग्न करतां येत नाहीं म्हणून येथून उडी घेतली. आणि घेतली म्हणजे कशी? प्रियकराला मिठी मारून आपल्या मोटारींत बसली आणि मोटार भरवेगानें सोडली ती कड्यावरून थेट खालीं—'

माझ्या डोळ्यांसमोर कड्यावरून कोसळणारी मोटर आली नि ते भोवळले. पण पासीन निर्विकार आवाजांत बोलतच होता,–'एटा म्हणजे अस्पृश्य—तुमच्या हिंदुस्थानांत अस्पृश्य आहेत तसे—'

पण माझें तिकडे लक्ष नव्हतें. पाय यांत्रिकपणें पासीनच्या मोटरीकडे वळले आणि यांत्रिकपणेंच मोटरींत जाऊन बसलों. डोळ्यांसमोर चित्रविचित्र दृश्यें उमटत, नाहींशी होत. ती भयंकर दरड, तिला फेंसाळ विळखा घालणारी लाट—मोटर तिच्यावर आदळते—भयंकर आवाज होतो—कानांत शिरतो—इंद्रियें बधीर होतात—सुरू होतात–त्यांच्यावरचा ताबा उडतो–कानांवर शब्दांचा आघात होतो...

पासीन आणि योशिए जपानमधील आत्महत्यांची चर्चा करीत असतात.

जपानमधलें आत्महत्त्यांचें प्रमाण उभ्या जगांत अधिक आहे—एका तेरा वर्षाच्या मुलानें डोकेदुखी असह्य झाली म्हणून उंदराचें वीष खाल्लें—प्रचलित सरकारबद्दल घृणा असह्य झाली—एका जोडप्याची अखेरची इच्छा 'आमचा विवाहविधि व दहनविधि एकदमच उरका'—एका प्रेताच्या खिशांत चिठी; 'मृत्यु किती मधुर आहे!'...

ती शिळा—त्या भ्रमिष्ट लाटा–ती चक्काचूर झालेली मोटार—मृत्यु मधुर...विवाहमंत्र–!

यावातानोला गेलों, तेथल्या जत्रेच्या वातावरणांत शिरलों नि शुद्धीवर आलों!

\+ + +

परत येतांना अतामीच्या एका हॉटेलमध्यें आम्ही चहासाठीं थांबलों. दीडदोन दिवसांच्या जत्रेच्या धबडग्यानें आमचें शरीर आणि मन आंबून निघालें होतें. पासीन मोटर हांकतां हांकतां अगदींच दमून गेला होता. चहा पिण्यासाठीं आम्हीं खालीं टेकलों ते टेकलोंच. पासीननें तर ततामीवर लोळणच घेतली. अखेरीस थोडी विश्रांति घ्यावी, रात्रीचें भोजन उरकावें आणि निघावें असें ठरलें. जपानमध्यें सारें कांहीं छान आहे पण रस्ते भयंकर आहेत. म्हणून लोक आगगाडी पसंत करतात. पण टाइमटेबलच्या पाशांतून सुटण्यासाठीं आम्हीं मोटरनें निघालों होतों. जपानच्या चिखलभरल्या खड्डेखांचीच्या रस्त्यानें मोटर हांकणें दिवसाहि कठिण. रात्रीं तर मृत्यूशीं हस्तांदोलन करूनच निघावें. पण पासीनला आज रात्रीं टोकियोला पोंचायलाच हवें होतें.

तास दीड तासाच्या विश्रांतीनें पासीनच्या नसा जरा मोकळ्या झाल्या. हिंमत जागी झाली. शिवाय जपानी रस्त्यांच्या चिखलांत मोटर थोडी घसरली म्हणजे त्याच्या अंगावर गोड शिरशिरी उठे!—त्यानें ॲक्सीलेटरवर पाय टाकला.

आम्हीं निघालों. पण जेवणाची सुस्ती पाश पसरूं लागली. स्टेशनसमोरच्या कॉफीगृहांत थोडी कॉफी ढोसावी असें ठरलें. कॉफीगृहांत शिरलों. चांगली तेजदार कॉफी मागविली. ती आणून देणाऱ्या मुलीनें आपलें मोतिया हास्य केलें आणि पासीनच्या कंटाळलेल्या चेहऱ्यावर एक खेळकर छटा उमटली. पासीन त्या मुलीशीं जपानींत हास्यविनोद करूं लागला. योशिएहि त्यांत सामील झाली. मला मात्र त्या मुलीच्या हंसऱ्या बदामी डोळ्यांभोंवतालचें हंसरें जाळें निरखण्यापलीकडे कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. यांत किती वेळ गेला समजलेंच नाहीं. एकदम माझें घड्याळाकडे लक्ष गेलें. मी चमकलों नि म्हणालों, 'चला उशीर झाला!"

पासीन म्हणाला 'चला'—पण त्यांत जोम नव्हता. त्यानें आणखी एकेक कप कॉफी मागविली. मुलीनें कॉफी आणली आणि पुनः ती गोड हंसली. पण आतां बोलत न बसतां लगेच निघून गेली. पासीनच्या चेहऱ्यावर एकदम थकवा पसरलेला दिसला. कॉफीचा एकेक घोट तो घेत होता, पण तोंडावाटे शब्द निघत नव्हता. अखेर कॉफीचा कप अर्धभरलाच टाकून तो उठला–

पण उठला तसाच बसला. म्हणाला, 'नाहीं बुवा, आपली ताकद नाहीं. पार दमलोंय् मी. आपण हॉटेलांत परत जाऊंया—रात्रभर विश्रांति घेऊं नि सकाळीं जाऊं.'

'होय पण तुझ्या कामाचं काय?'

'जळूं दे तें—दहा यार्ड गाडी हांकण्याची तयारी नाहीं माझी.'

माझें काय, मला बरेंच वाटलें. जपानी हॉटेलांतल्या मऊ गाद्या-गिरद्यांवर लोळत लोळत पापण्यांवर स्वप्नांचीं फूलपांखरें नाचविण्याच्या कल्पनेनें मी खूष होऊन गेलों. योशिएहि खूष दिसली.

\+ + +

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठनऊ वाजतां आम्ही निघालों. आमची मोटर मैल दीड मैल आली तोंच तिच्या इंजिनांतून कसलासा चमत्कारिक आवाज येऊं लागला.

"काय झालं बुवा या मोटारीला?—असा आवाज कधीं आला नव्हता"—पासीन म्हणाला.

एक दोन मैल आम्ही तसेच आलों. मोटरचा तो आवाज हळुहळू वाढत होता—आणि मग एकदम गपकन् थांबला—कारण मोटरच थांबली. इंजिन बंद पडलें होतें.

सुदैवानें जवळच एक मोटरचें रिपेर-शॉप होतें. वर्कशॉपच्या मॅनेजरनें आमची मोटर ओढून आणवली. लगेच त्यानें इंजिनचें झांकण उघडलें. डोळे इंजिनवरून फिरविले. इंजिनचे एकदोन भाग काढले, त्यांची चांगली तपासणी केली. इंजिनांत चारपांचदां ठाकठूक केली—आणि शेवटीं म्हटलं,

"चांगला तास दीड तास लागेल. दुरुस्त व्हायला."

आमचे सर्वांचेच चेहेरे पडले. आम्हांला टोकिओला जायची घाई होती. शिवाय पोटांत कावळे ओरडूं लागले होते. ओडावाऱ्याला न्याहारी करायचा बेत होता. आमच्या चेहऱ्यावरची भूक पाहून कीं काय मॅनेजर म्हणाला,

"येथून जवळच डोंगरांत एक रेस्टोरॉं आहे. आमची मोटर तुम्हाला तेथं पोचवील. तास दीड तासांत चहाबी पिऊन या—तोपर्यंत तुमची गाडी दुरुस्त करून ठेवतो."

आणि आम्ही त्या रेस्टोरॉंकडे निघालों.

दहापांच मिनिटांतच आमचा रस्ता डोंगरावर चढला आणि पासीनची मोटर बिघडली तेंच बरें झालें असें वाटूं लागलें. जपानचा सारा मुलूखच मस्त आहे; पण इतक्या रमणीय भागांतून मी पूर्वी कधीं गेलों नव्हतों. रस्ता नागमोडी वळणें घेत घेत डोंगराची एकेक

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

उंची कात्रीज करीत आहे, सुगीचें जंगल मानवी मिजास आणि व्यवस्था यांच्या नैसर्गिक मिलाफाचे मुक्त नमुने दाखवीत आहे, या जंगलाच्या अवकाशांतून कधीं स्वच्छंद समुद्राचें तर कधीं समृद्ध खोऱ्याचें दर्शन होत आहे—आणि जपानच्या निसर्गाचा सारा रंगदारपणा अंतःकरणाचे कोपरेन् कोपरे खुलवून टाकींत आहे—अशा स्थितींत आम्ही त्या रेस्टोरॉंकडे निघालों होतों...

इतक्यांत एक छोटेसें शिंटो मंदिर दिसलें आणि त्याच्या आवारांत कसला तरी विधि चालला आहे हें ध्यानांत आलें. यावातानोला दिसले होते तसे भटजी आणि एकदोन प्रतिष्ठित नागरिकत्वाचा पोशाख चढविलेले इसम तोंडानें ( परवचा म्हटल्याप्रमाणें ) कांहीं तरी म्हणत आहेत आणि हातानें कांहीं तरी धान्य इतस्ततः उडवीत आहेत असें दिसलें. मी नीट ऐकूं लागलों—तेव्हां "ओनी वा सो.ो; फुकुवा उची" हा मंत्र ते पुनः पुनः म्हणत आहेत असें लक्षांत आलें. मी योशिएला विचारलें—

"हा कसला मंत्र ?"

"याचा अर्थ 'पिशाच्चानों हट जाव; देवतांनों आंत या' असा आहे—हातानें भात व घेवड्याचे दाणे उडवतांना म्हणण्याचा तो मंत्र आहे."

"पण हें सारं कशासाठीं चाललं आहे ?"

"पिशाच्चांना घालविण्याचा विधि आहे तो. वास्तविक तो वर्षांतून एकदांच करतात. पण ह्या भागांत भुताखेतांचा फार धुमाकूळ चालतो, तेव्हां हा विधि वारंवार होतो. एकादा भूतबाधेचा विशेष प्रकार झाला तर मुद्दाम करतात."

जपानसारख्या सुधारलेल्या देशांतले लोक अशा भोळ्या समजुतींच्या आधीन असावे याचें मला नवल वाटलें. पण फार नाहीं. पुष्कळदां हा भूमीचा आणि वातावरणाचा गुण असतो. आमचे मोठमोठे सुशिक्षित कोंकणांत गेले कीं त्यांचें असेंच होतें हें मला माहित होतें.

रेस्टोरॉंचें दर्शन झाल्याबरोबर दृष्टि निवली. जपानी चीड ( पाईन ) आणि मोरपंख (सुगी) यांच्या डंवरलेल्या राईच्या मधोमध, जपानी वास्तुशिल्पाचें सौन्दर्य उधळीत उभी असलेली एक डगडगित इमारत. जपानी कलेची चोखंदळ नजर तिच्यावर सर्वत्र पसरलेली होती. इमारतीच्या तकतकीत लाकूडसामानाची रेषान्रेषा व्यक्त होत होती आणि रंध्याचा स्पर्श न झालेल्या खांबांत आणि तुळयांत निसर्गाची स्वाभाविक लय व्यक्त होत होती. खोल्यांच्या सरकत्या दरवाज्यावरील तावदानांत किडीनें पोखरलेल्या फळीचा स्थलचित्र निर्माण करण्यासाठीं उपयोग केलेला पाहिला तेव्हां तर जपानी कलावंतांच्या निसर्गसाधनेचा साक्षात्कारच झाल्यासारखा वाटला !

मी विचार करूं लागलों—निसर्गाच्या प्रत्येक लोकविलक्षण घटनेंत भुतेंखेतेंपिशाच्चें शोधणाऱ्या जपान्यांच्या भोळ्या वृत्तींत आणि या कलात्मक निसर्गसाधनेंत कांहीं नजिकचें नातें असेल का ?

रेस्टोरॉंच्या मुलींनीं न्याहारी आणली आणि पासीन त्यांच्याशीं 'अनोने' 'आसोदेस्का' करीत बसला. योशिएहि त्यांत भाग घेत होती. त्या जपानी संभाषणांत सामील होणें मला शक्यच नव्हतें, तेव्हां, त्या मुली हंसल्या म्हणजे हंसायचें, त्या हंसऱ्या नजरेनें बोलल्या म्हणजे आणखी हंसायचें—आणि त्यांच्या मासोळीसारख्या डोळ्यांतल्या लकाकीचा कवडसा निरखायचा, एवढेंच मला जमण्यासारखें होतें. पण बाहेर निसर्ग मस्त पसरला होता — आणि त्याच्याकडे टक लावून बघतांना

Swastik brings versatile rubber in your service

Every day rubber is being put to new uses. For the new India of progress and prosperity, SWASTIK brings the fruits of research and development. Every move that SWASTIK makes is to make your life happier, more comfortable. SWASTIK Quality Rubber Goods: Gum Boots, Hoses, Surgical Gloves, Electric Cables, Industrial Rubber Accessories.

SWARUP CABLE

Swastik
QUALITY RUBBER GOODS



RUBBER PRODUCTS LIMITED, KIRKEE, POONA-3.

SRP/E-10/59
TOM & BAY





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्या मेळाव्यांत असून नसल्यासारखें होण्याची उत्कृष्ट सोय होती.

समुद्रकांठच्या एका टेकडीवरील धारेवर हे रेस्टोरॉं होतें. तेथून टेकडी एकदम खालीं उतरली होती आणि तिच्या पायथ्याशीं धडकणाऱ्या समुद्राचा लयदार आवाज रेस्टोरॉंमध्यें ऐकूं येत होता. चीड (मात्सु) आणि मोरपंख (सुगी) यांच्या शाखांचा शिवशिवता विस्तार येथून दिसत होता. आपल्या डौलदार शाखांवर नक्षीदार पानांचा मोहर घेऊन सरळ ताठ उभे असलेले मोरपंख आणि त्यांतच मधुनमधून पसरलेले, वक्र वळणाचे, पिळवटलेल्या फांद्यांचे आणि गोंडेदार विस्ताराचे चीड पाहून महाकाव्य आणि विडंबनगीत यांचें हें मोठें मजेदार मीलनच झालें आहे असें मला वाटलें (आणि एकदम एक खट्याळ विचार मनांत आला कीं मथुरेच्या शिल्पसंग्रहांतील बुद्धाच्या मूर्ति आणि एप्स्टाईन्—हेन्री मूर—लिप्चिझ् यांच्या शिल्पकृति यांचें संयुक्त प्रदर्शन भरविलें तर कसें दिसेल ?)

एकदम वाटलें, या मात्सु-सुगींच्या वनांत हिंडलेंच पाहिजे. योशिए–पासीनला (विशेषतः पासीनला) रेस्टोरॉंमधल्या मुलींच्या कलदार हास्याचें आणि कांचेरी आवाजांतल्या संभाषणाचेंच अधिक आकर्षण दिसलें. मी एकटाच बाहेर पडलों. खरोखर तें भटकणें म्हणजे सारीं इंद्रियें मोहरून टाकणेंच होतें. त्या वनांतल्या कोवळ्या लुसलुशीत गवताचा पोपटी रंग—आणि मधुनमधून त्याच्यावर पडलेल्या चिडाच्या तांबूस करड्या सळ्यांचा थर—पिसांच्या पथारीवरून चालतां चलतां एकदम सरक खेळांत सामील झाल्यासारखें वाटे. खेळाच्या नादांत मी टेकडीच्या टोंकाला केव्हां गेलों तें ध्यानांतच आलें नाहीं. तेथून पाहिले तों तो परवा पाहिलेला भयंकर कडा समोर उभा ! तो येथून इतका जवळ, अगदीं पलीकडेच असेल असें वाटलें नव्हतें. त्या कड्याच्या अणकुचीदार कपारी, त्याच्या पायथ्याच्या त्या भयंकर शिळा आणि त्याच्या भोंवतालीं फेंफरें आल्यागत फेंसाळणाऱ्या समुद्राच्या लाटा—सारें कांहीं स्वच्छ दिसत होतें. मला ती आत्महत्त्येची हकीगत आठवली—डोळ्यांना भोवळ येतेसें वाटलें. मी परत फिरलों.

× × ×

तासभरानें आम्हीं वर्कशॉपकडे परतलों तेव्हां मॅनेजर अद्याप भकास चेहऱ्यानें आणि त्रस्त नजरेनें मोटरच्या इंजीनकडे पाहातच होता. आमची चाहूल लागल्यावर त्यानें आमच्याकडे फक्त एक धुकट कटाक्ष टाकला. पासीननें विचारलें तेव्हां थकलेल्या स्वरांत तो एवढेंच म्हणाला, 'आश्चर्य आहे. कांहीं पत्ता लागत नाहीं. बिघाड तर कांहीं दिसत नाहीं."

कपाळावर हात मारून घ्यायचा तेवढेंच आमचें शिल्लक राह्यलें. मोटरीची प्रकृति ताळ्यावर येईपर्यंत येथें नुसतें हायहुश्श करीत राहण्याची कल्पना असह्य होती.

पण आशेचा एक किरण फिरकला. मॅनेजर म्हणाला, 'माझा मेक्यानिक आला म्हणजे तो कांहीं करतो का पाहूं—आज अद्याप तो कां आला नाहीं कळत नाहीं.'

तो एवढें म्हणतों आहे तोंच तो मेकॅनिक आला. त्याच्या डोळ्यांत जाग्रण आणि चेहऱ्यावर कसली तरी त्रस्त उत्सुकता. आल्याबरोबर तो म्हणाला,

"कालरात्रीं देवळापलीकडच्या पुलावर मी एक भूत पाहिलं."

"काय भूत !" मॅनेजर ओरडलाच !

अर्थात् मला यांतलें कांहीं कळलें नव्हतें. पण पासीनच्या खुलाशानंतर समजलें—"काल रात्रीं त्यानें भूत पाहिलें होतें."

सविस्तर माहिती सांगतांना तो म्हणाला, "रात्रीं एक दीडचा सुमार असेल. मी त्या पुलावरून चाललों होतों. तों समोरून एक स्त्री आणि एक पुरुष एकमेकांना अगदीं बिलगून येत असलेले दिसले. प्रथम त्यांच्या आकृत्या सफेत धुकट दिसल्या. क्षणार्धांत त्या स्वच्छ झाल्या. स्त्रीच्या अंगावर एक झोंकदार रंगीन किमोनो होता. मी निरखून पाहिलें. किमोनोवर रक्ताचे डाग—आणि तिच्या हातांत मोटरचें चाक ! क्षणभर कांहीं दिसेनासें झालें. आणि नंतर पाहतों तों आकृत्या पुनः धुकट ! क्षणार्धांत त्या बाजूच्या जंगलांत शिरल्या—आणि पाहतां पाहतां नाहींशा झाल्या."

जरा वेळानें एक शुष्क हास्य करून तो म्हणाला, "दुर्दैव माझं—त्यावेळीं मजपाशीं क्यामेरा नव्हता, नाहीं तर फोटो घेतला असता त्यांचा."

जपान्यांचें फोटोचें वेड मला माहित होतें. (चिनी माणसाच्या डोळ्यांना चष्मा लावला नि खांद्याला क्यामेरा अडकविला कीं जपानी माणूस तयार होतो, ही व्याख्या मीं ऐकलेली होती.) पण भुताचा फोटो घेण्याइतकी या वेडानें मजल मारली असेल याची मला कल्पना नव्हती !

कांहीं वेळ तो त्या भुताबद्दलच बोलत होता. जरा वेळानें मॅनेजरनें त्याला आमची मोटर पाह्यला सांगितलें. त्यानें लगेच बाह्या सरकविल्या आणि ओव्हरऑल चढवून, इंजिनांत डोकें खुपसलें. बराच वेळ त्याचें ठाकठूक सुरू होतें. इंजिनचे बरेचसे अवयव बाहेर आले, आंत गेले. पण कांहीं बोध होतो असें त्याचा चेहरा सांगेना. अखेरीस म्हणाला,

"कांहीं कळत नाहीं बुवा ! भुतानें झपाटलें—बिपाटलें कीं काय ?"

मॅनेजरचे एकदम डोळे लकाकले. म्हणाला, 'असेल ! असेल !'

'तसें असेल तर ही ठाकठूक काय कामाची ?'–मेक्यानिक म्हणाला.

लगेच त्यानें ओव्हर ऑल उतरला. पलीकडे पाटाचें पाणी वाहात होतें, तेथें गेला, हातपाय धुतले, चेहरा धुतला—आणि पलीकडच्या छोट्याशा देवळाकडे चालू लागला. तेथल्या डोणींतल्या पाण्यानें पुनः हातपाय धुतले. शेजारच्या एका झुडपाचा टाळा तोडून घेतला. देवळासमोर गेला. तोंडानें कांहीं तरी बडबडत टाळा अतिजोरानें हवेंत फिरवला. मग त्यानें गुडघे टेकले. टाळासकट हात जोडले आणि डोळे मिटून प्रार्थनेस सुरवात केली.

पंधरावीस मिनिटें त्याची प्रार्थना सुरू होती, आम्ही इकडे चूपचाप उभे होतों.

प्रार्थना आटोपून तो आला तेव्हां त्याचा चेहरा विलक्षण शांत दिसला. डोळ्यांतलें जाग्रण पार उडालें होतें चेहऱ्यावरची व्याकुळता नष्ट झाली होती. नजरेंत निश्चिंति होती. मला वाटलें तें भूत आतां शांत झालें असो वा नसो, आमची मोटर हा आतां अधिक हुशारीनें पाहूं शकेल.

परत आल्याबरोबर त्यानें ओव्हर-ऑल चढविला आणि इंजिनांत डोकें खुपसलें.

पंधरावीस मिनिटांत इंजिनांत एक ठिणगी चमकली त्याबरोबर त्यानें डोकें बाहेर काढलें, म्हणाला—

"झाली दुरुस्त ! दहा मिनिटांत सुरू करतों"

• • •








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

...आणि तें सारें आज मनाला जाळीत जाळीत जिवंत झालें. परमेश्वराच्या शोधाची कहाणी सांगायला आलेला ब्रह्मानंद बाईंच्या मनांत अस्वस्थता, हुरहूर, बेचैनी यांचीं रोपें रुजवून गेला.



# शोध

ल. ग. जोग

"शिवा, जा त्यांना आंत घेऊन ये." मालतीबाईंनीं शिपायाला सांगितलें. जाणाऱ्या शिवाला मधेंच थांबवून त्या पुढें म्हणाल्या,

"नी हें बघ, हा कोण स्वामी आहे माझ्या कांहीं लक्षांत येत नाहीं म्हणून तूंहि इथंच जवळपास रहा."

"हो बाईसाहेब" मुंडी हलवीत व खांदे वरखालीं करीत शिवा दरवाजावरचें झडप आपटून बाहेर गेला. मालतीबाईंनीं स्वामीनें पाठविलेल्या चिठीकडे पाहिलें. हस्ताक्षर किंचित् ओळखीचें वाटलें. त्या चिठीवरचें 'ब्रह्मानंदस्वामी' हें नांव त्यांच्या परिचयाचें नव्हतें. चिठी देतांना शिवानें केलेल्या वर्णनाच्या आधारानें त्या स्वामीचें चित्र रेखाटूं लागल्या. कुणी दाढीवाला उंच गोरटेला तरुण साधु, बाईंची भेट घ्यायला येत होता. त्या मुलींच्या वसतीगृहाच्या प्रमुख असल्यामुळें अनेक पालक त्यांना भेटत. शिवानं ती चौकशी केली होती. तो कुणाचा पालक नव्हता. व बाईंना भेटलंच पाहिजे असें त्याचें म्हणणें होतें. हा स्वामी कोण असावा व कॉलेज लेडीज् होस्टेलच्या प्रमुखांना कां भेटणार असावा हें मालतीबाईंना कळेना. नक्की अंदाजच करतां येईना. त्यांनीं पुन्हां त्या चिठीकडे पाहिलें. 'ब्रह्मानंदस्वामी भेटूं इच्छितात' या निरोपाखेरीज त्यांत कांहीं नव्हतें. मात्र हें हस्ताक्षर आपल्या परिचयाचें आहे असें त्यांना वाटलें. त्या विचार करीत होत्या. चिठीकडे पाहात होत्या. तेवढ्यांत शिवानं स्वामीला टेबलापर्यंत आणून पोंचवलें आणि बाईंच्या हुकुमाप्रमाणें तो दरवाजांतल्या स्टुलावर बसायला गेला.

"Good Morning, Madam" स्वामीनें शुद्ध इंग्रजींत उच्चारलेले शब्द ऐकून शिवाहि थोडा चकितच झाला परंतु बाईतर फार गोंधळल्या. इंग्रजी बोलण्याची ती पद्धत त्यांच्या परिचयाची होती आवाज़हि अनोळखी नव्हता. तुकतुकीत काळे केंस, चेहरा झांकून टाकणारी दाढी, अंगावर मळकट खादीचें उपरणें आणि कपाळशूळ उठवणारा खडावांचा आवाज—त्या स्वामीचा वेष असा विचित्र होता. हस्ताक्षर व बोलण्याची लकब ह्या अक्षांशरेखांशाच्या सहाय्यानेंसुद्धां मनाच्या नकाशांत ह्या साधूची नक्की जागा बाईंच्या लक्षांत येईना.

"Madam, तुम्ही मला ओळखलं नसेल—" असं म्हणून तो

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

हंसला. त्या जटाजूटाच्या जंगलांतहि बाईना त्याचें हंसणें जाणवलें. हें हास्यहि अनुभवाचें आहे हें त्यांना जाणवलें. सारें काहीं परिचयाचें पण तरीहि समोरचा मनुष्य ओळखतां न आल्यामुळें त्या गोंधळून म्हणाल्या,

"You see, I can't locate you exactly; But I feel I know You."

"Oh that's enough" त्या स्वामीच्या ह्या विचित्र उत्तरामुळें तर त्या अधिकच गोंधळल्या. क्षणभर हें उत्तर जरा उद्धटपणाचेंहि वाटलें त्यांना. तेवढ्यांत स्वामीनें सांगितलें,

"Madam, मी दातार–निरंजन दातार"—

त्यानें आपलं नांव सांगितल्यावर बाईची सारी भूमिकाच बदलली. तें हस्ताक्षर, हंसण्याची ती लकब, तें बोलणें नी शेवटचें तें अकारण उद्धट उत्तर–साऱ्यासाऱ्यांचा एकदम अन्वय लागला. स्मृतीच्या नकाशांत हवें तें गांव सांपडलें.

You can't recognize me, madam"

"Obvious" त्यांच्या उत्तरांत आतां मोकळेपणा आला. चेहऱ्यावरचा ताण-कमी झाला व त्याहि हंसत म्हणाल्या, "होतांत कुठं वर्षभर ? एकादी सिनेमा नाटक कंपनी गांठली कीं काय ?"

तेवढ्यांत त्यांना शिष्टाचाराची आठवण होऊन त्या म्हणाल्या, "बसा कीं"

तो समोरच्या खुर्चीवर बसला. त्यानें पाठविलेले तें चिटोरें हातांत घेऊन त्याच्याशीं खेळत त्या म्हणाल्या "मुलींच्या वसतिगृहांत यायला संन्याशाचा वेष धारण करण्याचा नियम नाहीं आमच्याकडे. We admit men wearing suits"

त्यांचें वाक्य तोडीत निरंजन म्हणाला.

"तसं नाहीं बाई. I am not making fun"

"मग काय तर ?" त्या हंसत म्हणाल्या.

"मी सहा महिन्यापूर्वी संन्यास घेतला"

त्याच्या आवाजांतला कंप बाईच्या हातांत उतरला. तें चिटोरें हातांतून गळून पडलें. त्यानें जें सांगितलं त्यामुळं त्या विलक्षण अस्वस्थ झाल्या. आपली ही अस्वस्थता समजूं नये यासाठीं हंसायचा एक दुबळा प्रयत्न करीत त्या म्हणाल्या, "संन्यास घेतलात तसा चहा कॉफी ?"—आपला प्रयत्न फसल्याची जाणीव त्यांना लगेच झाली.

"बाई, मी अरण्यांत डोंगरावर गुहेंत राहातों. चहा वगैरे सगळं गेलं. एकादी वस्तू वितळावी ना, तशी माझ्या अंगाखांद्यावरची ही संस्कृति पार वितळलीय्."

"बरं तें जाऊं दे, सरबत तरी ?"

"घेईन कीं—"

पडत्या फळाची आज्ञा घ्यायला टपल्याप्रमाणें त्यांनीं चटकन् शिवाला हांक मारली व सरबत आणायला सांगितलें व नेहमीप्रमाणें त्याला थांबवून म्हणाल्या, "आणि तूं बाहेरच थांब, कुणी आलं तर कळव मला." शिवा गेल्यावर त्यांनीं निरंजनकडे सरळ पाहात म्हटलें.

"माझा विश्वास बसत नाहीं तुमच्या बोलण्यावर."

"पण मी अगदीं खरं खरं सांगतोंय्."

"It can't be, its impossible."

"कां ?" ठाम निश्चयी आवाजांत त्यानें विचारलें, "कां शक्य नाहीं ? मी गेले ८ महिने वनवासी आहें. मठांत राहातों, गुहेंत ध्यान करतों. परमेश्वराचा शोध करतोंय् मी."

आलेल्या सरबताचा एक ग्लास त्याच्या हातांत देत मालतीबाई म्हणाल्या, "मिस्टर दातार"—आपण या जटाधारी ब्रह्मानंदस्वामीला 'मिस्टर' म्हणण्यांत चूक करतों आहोंत हें त्यांना पटत होतें. त्याला स्वामी म्हणणें पटतहि नव्हतें. शेवटीं थोड्याशा संकोचानें त्या म्हणाल्या.

"मला हें ब्रह्मानंदस्वामी वगैरे कांहीं म्हणायला जमायचं नाहीं तेव्हां सांगा कीं तुम्हीं आतां इथें कां आलांत ? होतांत कुठं ? सहज आला होतांत कीं—"

"म्हटलं तर होतं एक काम."

"कोणतं ?"

"Madam तुम्हीं आम्हाला Concept of God शिकवीत होतां ना ?"

"त्याचं काय ?"

"तेव्हां तुम्हीं म्हणायच्या, God is an experience entirely Personal देव ही वैयक्तिक अनुभवाची गोष्ट आहे म्हणून ! शिवाय तुम्हीं पुढं म्हणायच्या यांत तर्काला फारसं स्थान नाहीं."

"हो; I still maintain that."

"पण तेव्हां मी तुमच्याशीं वाद घातला होता. माझं मत होतं कीं सारं कांहीं तर्कावर सिद्ध व्हायला हवं म्हणून मी मुद्दाम सांगायला आलोंय्."

"काय ?"

"१६ नंबरमधल्या इंदू गांधीचे पालक आले आहेत" शिवा आंत येत म्हणाला.

"अस्सं. त्यांना थोडं थांबायला सांग."

"ते सांगतात कीं भेटलंच पाहिजे आत्तां, ते गांवाला निघालेत्"

"बरं, मग घेऊन ये त्यांना आंत" निरंजनकडे वळून त्या म्हणाल्या, "मग पुढं काय ?"

"देव कल्पना वैयक्तिक आहे व अनुभवगम्य आहे हें मला आतां पटतं."

"तें कां ?"

"मला तसा अनुभव आलाय्."

निरंजनच्या बोलण्यांत एकप्रकारची प्रचीति होती. तो इतका आत्मविश्वासानें बोलत होता कीं त्याच्या दृष्टींत एक प्रकारचें तेज उजळून गेलें तेवढ्या वेळांत. मालतीबाईंना आतां त्याच्या दृष्टीला दृष्टि मिळवण्याचें साहस करवेना. एकाद्या उंच पर्वताच्या आपण केवळ पायथ्याशीं उभं रहावें व त्या आकाश भेदून जाणाऱ्या उंचीकडे पाहून शरमून जावें असेंच त्यांना वाटूं लागलें. मालतीबाईंचा दूर होत जाणारा मनाचा गोंधळ पुन्हां सुरू झला. तेवढ्यांत शिवानें 'गांधी' ना आंत आणलें व मालतीबाईंच्या मनाचा गोंधळ क्षणभर



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

व्यवसायाच्या बोलण्यामागें दडला. गांधींना खुर्चीवर बसायला सांगत त्या निरंजनला म्हणाल्या,

" हें पहा Mr. Datar तुम्हीं भेटलांत हें फार फार बरं झालं. पुन्हां केव्हां येतां सवडीनं ? खूप बोलायचंय मला. "

" इथं राहिलों तर येईन; पण राहीन कीं नाहीं हें नाहीं सांगतां येत."

" But do come; अगदीं याच."

I'll try " खुर्चीवरून उठतां उठतां तो बोलला. त्या बोलण्यांत परत भेटण्याची आतुरता मुळींच नव्हती असें नाहीं. मालतीबाईकडे पहात तो म्हणाला, " बरं येतो हं Madam."

बाहेर जाणाऱ्या निरंजनकडे गांधींनीं अशा कांहीं नजरेनें पाहिलें कीं मालतीबाईंना उसनें हंसून सांगावें लागलें.

" त्यांचं नांव निरंजन दातार. माझ्या विषयाचे–Philosophy चे विद्यार्थी आहेत ते " आपण दिलेल्या माहितीचा गांधींवर कितपत परिणाम होतो आहे तें न्याहाळीत त्या पुढें म्हणाल्या, " आपलं काय काम आहे ? "

गांधी आपलें काम सांगत होते व स्वयंचलित यंत्रासारख्या मालतीबाई त्याचें काम करीत होत्या. खरें म्हणजे त्यांचें कामाकडे लक्ष नव्हतें. त्यांच्या मनाला सहस्र फांटे फुटले होते आणि निरंजनभोंवतीं घिरट्या घालीत होते. एक तीस वर्षांचा तरुण मोठ्या ऐटींत व सहज सांगतो कीं मी परमेश्वराचा शोध करतोंय. जणूं काय कपाटाची हरवलेली किल्लीच शोधायची आहे इतक्या सहजतेनें; ' आपण संन्यास घेतलाय ' असं अलगद सांगणारा निरंजन ' मी चहा घेतलाय ' इतक्या सहजतेनें सांगतो या घटनांचा त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. त्या गोंधळल्या, अस्वस्थ झाल्या, बेचैन झाल्या. गांधी गेल्यावर त्यांनीं शेजारच्या आरामखुर्चींत अंग टाकलें. त्यांचे मनच त्यांच्या ताब्यांत येईना.

सारा दिवस ती अस्वस्थता त्यांच्या मनावर कृतींवर आपली लांबलचक छाया टाकून होती. कॉलेजांत तास घेतांना आवश्यक नसतांनाहि God is a personal concept and an experience entirely personal हें वाक्य बोलण्याचा मोह होऊं लागला. सायंकाळीं रात्रींहि ह्याच एका वाक्याचे अगणित प्रतिध्वनी कानांवर आदळत असल्यासारखे त्यांना वाटूं लागले. आणि घणघणणाऱ्या घंटानादासारखें ऐकूं येणारे तें वाक्य आपल्या पुढें मागें स्मृतींचं मोहोळ उठवूं लागलें.

हा निरंजन दातार म्हणजे कॉलेजांतला टवाळ मुलांचा मुकुटमणि ! त्याच्या वागण्यांत, बोलण्यांत स्वैर होता. बोलण्यांत एकप्रकारचा आकर्षक मिस्किलपणा होता. स्वभावाला शोभा आणणारा किंचित् उद्धटपणा त्याच्या वागण्यांत होता. त्याला इंटरमधून वर यायला नक्की किती वर्षं लागलीं हें सांगणें सोपें नव्हतें. त्यानें ' तत्त्वज्ञान ' विषय घेतला त्याचें कारण मालतीबाईंना माहीत होतें. मालतीबाईंच्या मुळेंच तो या विषयाकडे वळला. थोड्याच दिवसांत त्या दोघांबद्दल वाद सुरू झाले व यांचे प्रवाद झाले. विद्यार्थी व प्रोफेसरबाई ' यांच्यांतल्या प्रेमसंबंधाच्या गप्पांत लोकांना विलक्षण रस वाटूं लागला होता. त्याच्या–आपल्याबद्दलच्या अफवांची त्यांना संवय झाली. तो, त्यांच्याकडे थोड्या कामुक आक्रमक दृष्टींनं पाहातो हें समजूनहि त्यांना तो अप्रिय वाटत नव्हता.

ह्या साऱ्या स्मृति एकमेकांत गुरफटून फेर धरून त्यांच्या मनापुढें नाचूं लागल्या. त्या उन्मत्त स्मृतींनीं मालतीबाईंच्या विचारकोशांत एका नव्या दाहक बीजाला जन्म दिला. एक विचार लखलखणाऱ्या विजेच्या आकृतीनें नी वेगानें धांवला, " प्रीतिवैफल्यामुळें तर निरंजननें संन्यास घेतला नसेल ? "

रबराच्या दोरीनें बांधलेला चेंडू जसा त्याच वेगांत मागें येतो तसा तो विचार त्याच वेगानें मागें आला, ' हो असंच असलं पाहिजे. विसाव्या वर्षी गोसावी होण्याचं युग नाहीं हें '—एकदां प्रीतिवैफल्य आणि संन्यास यांचें नातें जोडणाऱ्या मनानें मालतीबाईंना पुन्हापुन्हा बजावून सांगायला सुरवात केली—' या वैफल्याला तूं कारण आहेस.'

कारण शोधण्याच्या नादांत त्या खूप मागें मागें गेल्या. त्यांना आठवूं लागलं कीं गेल्या वर्षापासून निरंजन आपणाला दिसला नव्हता. कॉलेज जीवनांत प्राध्यापकाला त्याच्या विद्यार्थ्यांची फार काळ आठवण राहातच नाहीं. नित्यनूतन व चिरतरुण जीवनांत तोच फक्त क्षणाक्षणाला तारुण्याकडून प्रौढत्वाकडे व तेथून गडगडणाऱ्या दगडाप्रमाणें वृद्धत्वाकडे जातो. त्या जीवनांत जुन्या विद्यार्थ्यांच्या स्मृति फार काळ रेंगाळणार तरी कशा ? तरी त्या विस्मृतीच्या तलावांत मनाचें पांखरूं चोंच मारीत होतें. व प्रत्येक वेळीं मासा येत होता एकच.—निरंजन दातार.

कॉलेजांतल्या एखाद्या विद्यार्थ्याचें एखाद्या प्राध्यापिकेवर प्रेम म्हणजे जरा अनपेक्षित, खळबळ उडवणारी व उघाचच शिष्टाचार दुखविणारी बातमी असते ! निरंजनचें मालतीबाईशीं वागणें विचित्र व वेगानें टप्याटप्यानं आक्रमण करणारें होतें. त्याच्या अनेक

करायला गेलों एक...



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



## समाधान !

माझी बायको मला म्हणाली
मी बाजारांत जाऊन येत्यें.

म्हणून मीहि मग बाजारांत गेलों
पण माझी बायको
कांहीं बाजारांत दिसली नाहीं.

माझा मित्र मला म्हणाला
मी दुकानांत जाऊन येतों
म्हणून मीहि मग दुकानांत गेलों
पण माझा मित्र
कांहीं दुकानांत दिसला नाहीं.

संध्याकाळीं मात्र
मी जेव्हां समुद्रावर फिरायला गेलों
तेव्हां किनाऱ्यावरच्या भुसभुशीत वाळूंत
माझा मित्र
माझ्या बायकोशीं
एकांत करतांना मला दिसला.

मला पहातांच तो तेथून उठला नसता
व मला त्यानें पांच पौंड दिले ते दिले नसते,
तर माझ्या हातांतील चाकूनें
मीं नक्कीच त्याचा मुडदा पाडला असता.

त्यानें दिलेले पांच पौंड मी मुकाट्यानं घेतले
नि बायकोला घेऊन घरीं परतलों.

—समुद्राच्या पाण्यानं
तिचं पाप धुवून काढलं होतं
अन् पैशाला तर काय
कसला वासच नसतो !

— एक आफ्रीकन गाणें.

कृतींचा अर्थ त्यांना उमगत होता. एकादं पुस्तक देतांना मुद्दाम बोटांना जाणवणारा त्याचा स्पर्श, आपल्याला रस्त्यांत अडवून वाद घालण्याची त्याची वृत्ति मालतीबाईंच्या परिचयाची झाली, त्याच्या शोधक घसरत्या दृष्टीचा टप्पा त्यांना कळला होता. पण त्याचें हें सारें करणें त्यांना आवडत नव्हतें व होतेंहि. एकदां तर सहलीच्या वेळीं दरडीवरून त्या उतरत होत्या. निरंजननें काठीचें एक टोंक धरून उतरायला सांगितलें. त्या उतरत होत्या. क्षणभर त्यानें काठीला एक सौम्यसा झटका दिला असा त्यांचा समज झाला. त्या झटक्या-मुळें त्यांचा तोल गेला व एक क्षणभर त्या निरंजनच्या खांद्यावर टेंकल्या. त्या एका क्षणांतहि निरंजनच्या दृष्टींतली वेगळी छटा त्यांना जाणवली. नंतर त्यानें कांहीं पत्रेंहि पाठविलीं. त्या पत्रांतली शब्दरचना दुहेरी अर्थानें भरलेली होती.

त्यांना हें आवडत नव्हतेंहि व होतेंहि. शिष्टाचाराला हें पटत नव्हतें प्राध्यापक बाई व वर्गातला एक मुलगा यांच्यांतल्या प्रणयाला सावधपणाचें कुंपण होतें. पण हळुहळुं निरंजनला व त्यांना, इतरांनीं गांवाबाहेरच्या टेकडीवर फिरतांना पाहिलें होतें. मालतीबाईंचा अजूनहि निर्णय होत नव्हता. हें जडणारे प्रेम विकृत नव्हतें. परंतु विचित्र खासच होतें. तो वयानेंहि त्यांच्याहून लहान होता. त्यांच्या आयुष्यांतहि अशी एक वेळ येऊन गेली होती कीं प्रेमाचें वेड व वेग त्यांनीं जाणला होता. त्यांच्या आयुष्यांत आतां प्रेमाला फारसें स्थान नव्हतें. तरीहि त्या निरंजनकडे ओढल्या जात होत्या. आणि त्यांच्या मनांत पुरा प्रेमाचा विकास होण्यापूर्वीच निरंजननें अधीरपणानें त्यांना विचारलें. नुसतें विचारलें नाहीं एकदां वर्गाच्या सहलीबरोबर त्या गेल्या होत्या. एकान्त साधून निरंजननें त्यांना बाहुपाशांत घेण्याचा यत्न केला. त्यानें मालतीबाईंचें चुंबन घेण्याचा यत्न केला. आणि तें सुख त्यांना हवेंहि होतें व नकोहि होतें. म्हणूनच त्यांनी आपली सुटका करून घेत म्हटलें,

" निरंजन दूर व्हा; Its a disgress. "

त्याच्या डोळ्यांतली प्रणयाची आरक्तता अजूनहि उतरली नव्हती. त्याला तें सारें खोटेंच वाटलें. पुन्हां तो त्यांच्या जवळ सरकूं लागला.

Please, please, leave me alone, go away from here " त्यांच्या मनानें इथेंच निर्णय घेतला. उतावळ्या निरंजननें त्यांना तो निर्णय घ्यायला भाग पाडलं.

त्या दिवसानंतर, त्या प्रसंगानंतर, त्यांना निरंजन भेटला नाहीं. आणि आज तो भेटला तो हा असा. मधेंमधें कुणी बोलत कीं निरंजननें कॉलेज सोडलें. तो संयुक्त महाराष्ट्रवादी युवकाचा नेता झाला आहे. मालतीबाईंच्या मनांतून त्याचें चित्र हळुहळु पुसट होत होत नाहीसें झालें.

—आणि तें सारें आज एकदम जिवंत झालें. मनाला जाळीत जाळीत जिवंत झालें. सकाळीं भेटून गेलेल्या ब्रह्मानंदानें त्यांचा सारा आनंद हिरावून नेला. तो परमेश्वराच्या शोधाची कहाणी सांगायला आला खरा. पण बाईंच्या मनांत अस्वस्थता, हुरहुर, बेचैनी यांचीं रोपें रुजवून गेला.

सायंकाळीं त्या अशाच विचार करीत बसल्या होत्या. एकादी

[ पान ३३ वर पहा ]

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

— नामदेव व्हटकर

शुद्ध मराठी बाण्याची ही कला समाजांतील लब्ध प्रतिष्ठितांनीं हिणकस, ओंगळ, अश्लील म्हणून बदनाम केली !



# तमाशांतील अश्लीलता

तमाशावर अश्लीलतेचा शिक्का बसला आहे. तो कानफाट्या म्हणून बदनाम झाला आहे. म्हणूनच त्याला समाजानें एक गर्हणीय, हीन प्रकार ठरविले आहे. तमाशांत अश्लीलता असते हें नाकारून चालायचे नाहीं. परंतु मुळांत अश्लीलता म्हणजेच काय ? ती कशी येते ! हें जर पाहिलें तर निःपक्षपाती आणि समतोल विचाराचा कुणीही माणूस तमाशाला दोष देणार नाहीं. तमाशाच्या प्रकृतिकडे पाहिलें तर त्याचें हाड श्रृंगाराचे आणि मांस भाविकतेचे दिसते आहे. त्याच्या स्वरुपाकडे पाहिलें तर त्याची वाद्यें, लावणी, नृत्य, वग आणि धाटणी हे शुद्ध मराठी बाण्याचे पंचप्राण त्यांत ओतलेले दिसतात. संगीत नृत्य, नाट्य, यांनी सर्वांगपरिपूर्ण असा हा मराठी लोकांचा स्वतःचा कलाप्रकार आहे. त्याला एक अश्लीलतेचा डाग लागला म्हणून तो सबंध कलाप्रकारच फेकून द्यायचा काय ?

एकादी गोष्ट अश्लील अश्लील म्हणून ओरडणाऱ्या लोकांनाही अश्लील म्हणजे निश्चित कसें हें सांगणें किंवा अश्लीलतेची व्याख्या करणें कठिण पडेल. आपणही या अश्लीलतेचे एकदम वर्णन न करतां पायरी पायरीनें तिला शोधत जाऊं या. कोणत्याहि काळी प्रचलित समाजांत हीन मानलेल्या गोष्टी तीन प्रकारांत विभागतां येतात. ते तीन प्रकार असे—

(१) बीभत्स.
(२) अशिष्ट.
(३) अश्लील.

समाजांत हीन मानलेल्या गोष्टींत बीभत्साला पहिली पायरी किंवा सर्वांत वरचा थर मानण्याचें कारण असें कीं संस्कृत नाट्यशास्त्रानें सुद्धां तो एक रसच मानून त्याला नाटकांत रंगभूमीवर स्थान दिलें आहे.

जे अमंगळ, अप्रशस्त, अप्रिय, जें पहायला ऐकायला बरे वाटत नाहीं—असें अनिष्ट, जे पहायला ऐकायला उद्वेगकारक आहे, त्यांतून बीभत्स रस उत्पन्न होतो. पण असेंही रंगभूमीवर दाखवायला नाट्यशास्त्रानें हरकत घेतलेली नाहीं. कारण सर्वच प्राणी स्थायीभाव नांवाच्या ज्या मूळ प्रवृत्ती घेऊन जन्माला आले आहेत तींतूनच रस निर्माण झाले. या मूळ प्रवृत्तींत ' जुगुप्सा ' नांवाची अशी हीनतेची आवड असलेलीही त्याची एक जन्मजात



अनुक्रमणिका
मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

प्रवृत्ति आहे. नाटकांत त्याही प्रवृत्तीला खाद्य मिळालें पाहिजे म्हणूनच बीभत्स हाही एक रसच मानून त्याला रंगभूमीवर संस्कृत साहित्यकारांनीं स्थान दिलें.

अशिष्ट म्हणजे चार चौघांत बसून बोलूं नये, पाहूं नये किंवा दिसेल असें करूं नये ते. या अशिष्टतेचे वर्णन असें करतां येईल कीं जे सभेंत बोलण्यासारखे नाहीं ते. बीभत्स हें सभेंत बोलून दाखवतां येते; अशिष्ट सभेंत बोलून दाखविलेले शोभत नाहीं. एकादा कादंबरीकार उकीरड्यावर मरून पडलेल्या कुत्र्याचे हुबेहूब वर्णन करून आपल्या कादंबरींत बीभत्स रस निर्माण करूं शकेल. परंतु आपला नायक सकाळीं उठल्यावर तिकडे तांब्या घेऊन गेलेल्याचे लिहायचे तो टाळील. याचे कारण ते चारचौघांना म्हणजे वाचकाला बरें वाटणार नाहीं. सभेंत, बैठकींत किंवा चावडींत बसल्यावर धसाधस नाकांतले केस हिसकून उपटणें, आसपासच्यांना पहायला कसे वाटेल, म्हणून तसें करणें शिष्टपणाचे मानत नाहींत.

पण एक मुद्दा मात्र इथें स्पष्ट केला पाहिजे तो असा कीं अशिष्ट या शब्दांतच ज्या शिष्ट किंवा प्रतिष्ठित लोकांचा उल्लेख आहे ते प्रतिष्ठित लोक कोण ? त्यांना कुणी प्रतिष्ठित ठरवले ? त्यांना कोणतें बोलणें किंवा कृति योग्य वाटेल आणि कोणती अयोग्य वाटेल हें कोण ठरवते ?

जगाच्या इतिहासांत हजारो वर्षांपासून कोणत्याहि समाजांत नेहमीं दोन प्रकारचे वर्ग पडलेले दिसून येतात. एक बहुधा जुन्या परंपरागत ज्ञानाचा, रुढीचा अभिमानी आणि जुनीच चांगली संस्कृति म्हणणारा वर्ग आणि दुसरा जुने मोडून नवे रुळवण्यांत गुंतलेला वर्ग. पहिल्या वर्गांत बहुधा पोक्त वयाचे धनिक आणि सत्ताधारी असायचे तर दुसऱ्या वर्गांत तरुण, गरजेपोटीं नव्याचा अंगिकार करणारे असे असायचे. यांतला पहिला वर्ग हा सदैव स्वतःच स्वतःला शिष्ट शहाणा म्हणवून घेत आलेला असतो. त्यांना वाटते ते चांगले हें त्यांनींच ठरवायचें आणि मग ते इतरानींही चांगले म्हटले पाहिजे अशी त्यांची अपेक्षा असते.

हाच प्रकार केवळ शिष्टाशिष्टतेच्या बाबतींत मराठी लोकांत पहायचा झाला तरी जुन्या वाडवडिलांनीं सांगितलेल्या ज्ञानाचा रुढींचा अभिमानी असा एक वर्ग समाजात आहे, तो स्वतःला "सुसंस्कृत" ऐसें म्हणवून घेतो. त्यांना चांगले वाटते ते चांगले. त्यांना बरें वाटत नाहीं ते वाईट—अशिष्ट, असा प्रकार आजही आहे आणि मागेही होता हें आपणाला दिसून येते. सातशें वर्षांपूर्वी या गांवढळ मराठी भाषेंत ज्ञानेश्वरी लिहिल्याबद्दल त्यावेळच्या शिष्टांनीं ज्ञानेश्वराला नाकें मोडलीच होती, म्हणून ज्ञानेश्वराला "माझा मऱ्हाटाची बोल कौतुके" म्हणून सांगावें लागले. तेव्हां हे जुने पोक्त लोक म्हणजे शिष्ट. त्यांच्या ज्या समजुती त्याच वागणुकीला उत्तम, त्यांना जें बोलणें शिष्ट वाटत आले तेंच शिष्ट आणि जे शिष्ट वाटत नाहीं ते अशिष्ट !

या अशिष्टतेंत अमुकच एक गोष्ट येते असें नाहीं. परंतु अश्लीलतेंत मात्र एकाच गोष्टीच्या अशिष्टतेचा निर्देश असतो. ती गोष्ट म्हणजे स्त्री-पुरुषाचा शरीरसंबंध. ही एक अत्यंत खाजगी ठरलेली बाब आहे. तिच्यासंबंधीं जेव्हां चारचौघांत होऊं नये अशा पद्धतीचा देखावा किंवा त्यासंबंधीचे शिष्ट लोकांत बोलणें निघते तेव्हां त्याला अश्लील म्हणतात. अशिष्टपणा हा कोणत्याही गोष्टीचा, एकट्या पुरुषाचा किंवा एकट्या स्त्रीचा असूं शकेल. स्त्रीनें पुरुषांत बसून डोकींतल्या उवा काढणें हे अशिष्ट असेल पण अश्लील नव्हे तसेंच पुरुषानें बाहेरची चार स्त्री-पुरुष मंडळी भेटायला आल्यानंतर त्यांच्यांत बसून छातीवरचा मळ काढणें हे अशिष्ट असेल पण अश्लील नव्हे. पण हेंच जेव्हां तो आपल्याच धर्मपत्नींशीं का असेना जे एकांतांत करावें ते सर्वांसमक्ष करूं लागला कीं ते अश्लील होते. तेव्हां स्त्री-पुरुष संबंधाचा जो अशिष्टपणा तो अश्लीलपणा.

परंतु स्त्री आणि पुरुष एकत्र आल्याशिवाय श्रृंगार घडतच नाहीं. शृंगाराचा अंतिम हेतु त्या स्त्री पुरुषाचा शरीरसंबंध हाच असतो. तमाशाचा जन्म शृंगारदर्शनासाठीं झाला. हा शृंगार दाखवायला आपल्या पूर्वजांनीं तो रसाचा राजा म्हणून मुक्तद्वार परवानगीही दिली. असा स्त्री पुरुषाचा शृंगार दाखव, परंतु त्यांच्या संबंधाचे प्रदर्शन मात्र करूं नको अशी तारेवरची कसरत तमाशाला करावी लागते. या तारेवर उड्या मारताना कित्येकदां त्याचा तोल जातो आणि असा तोल गेला कीं ते शिष्ट लोक ओरडूं लागतात, "अश्लील– तमाशा अश्लील–"

शृंगार आणि अश्लीलता यांतील मधली भाग करणारी अशी रेषा इतकी लवचिक व स्थळकाळाप्रमाणें हलती, अस्पष्ट आहे कीं हा शृंगार आणि ही अश्लीलता हें सांगणें कठिण पडते.

'सचोटी' हें मान्यवर संस्थेचें ब्रीद असतें. आणि आजवर त्यालाच आम्हीं जागत आलों आहोंत !
अनेकरंगी आकर्षक व उत्कृष्ट ब्लॉक्स बनविण्याचें मुंबईतील प्रख्यात विश्वासार्ह केंद्र.
★
बॉम्बे प्रोसेस स्टुडिओ
क्रिसेण्ट चेंबर्स–टॅमरिण्ट लेन, फोर्ट—मुंबई १.
फोन : २५२९४५



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

शिवाय अश्लीलता ही कालमानानें बदलत असतेच. उदाहरणार्थ पुराण काळांतल्या स्त्रीपुरुष संबंधाच्या गोष्टी लोक अतिशय भक्तिभावानें ऐकतात, सांगतात. त्याची चित्रें घरीं लावतात; परंतु तसा शृंगार आतां कोणी दाखवायला जाईल तर तें मात्र चालायचे नाहीं. श्रीकृष्णानें नदींत आंघोळ करणाऱ्या स्त्रियांची वस्त्रें झाडावर ठेवल्यामुळें जे दृश्य दिसते त्याची चित्रें घरोघरीं लागतात, पण तसें कोणी आजच्या नाटकाचित्रपटांत अथवा तमाशांत दाखवील तर तें मात्र अश्लील!

शिवलीलामृतांतील कार्तिक स्वामीच्या जन्माची अत्यंत अश्लील कथा लोक भक्तिभावानें वाचतात. पण अशी एकादी अद्भुतरम्य गोष्ट कोणी तमासगीर रचून वगांत दाखवील तर चालेल काय? एवढें कशाला, खुद्द शिवलिंग हें संभोगाचेंच चित्र आहे, तरी त्याची मोठ्या भक्तीभावानें पूजा करायची पण याच्या पासंगालाही न पुरणारी होनाजीची लावणी मात्र अश्लील अश्लील म्हणून ओरड करायची!

अश्लीलतेच्या बाबतींत कालमानाचा हा फरक केवळ पुराणें आणि आजचे साहित्य यांतलाच नाहीं. तो कालमानाप्रमाणें बदलत जाणारही आहे. चाळीस पन्नास वर्षांपूर्वी "रांडलेक, रांडेच्या, बटकीच्या" अशा शिव्या शिष्ट समाजांतहि चालत होत्या, आज त्या अशिष्ट किंवा अश्लील झाल्या आहेत. याच चाळीस पन्नास वर्षांपूर्वी एकाद्या तरुण जोडप्यानें संततिनियमनासंबंधीं कांहीं चर्चा करणें भयानक अश्लील मानलें गेलें असतें. आज अशी चर्चा वधुवर आपल्या आईबापासमोरही करूं शकतात. तेव्हां अश्लीलता ही सदैव बदलत जाणारी कल्पना आहे.

अश्लीलतेच्या बाबतींत हा जसा कालमानाचा फरक पडतो तसा स्थळांचाही तो पडतो. विलायतेंतल्या एकाद्या स्टेशनवर परदेशी निघालेला पति आपल्या पत्नीचें थोड्याशा उघड्यावरही आवेगानें चुंबन घेऊं शकतो. परंतु भारतांत एकाद्या स्टेशनवर असा, कुणी आपला आदमी प्रयत्न करील तर तो कायद्याच्या कचाट्यांतही सांपडायचा. कांहीं देशांत अनेकांना चुंबनें देऊन सरावलेल्या ओठांची 'कन्या'च पत्निपदाला लायक समजली जाते, तर कांहीं देशांत स्त्री-पुरुषाला



# ती शुभ्ररात्र

मध्यरात्रींचा तिसरा प्रहर पूर्वेला कलला आहे,
रस्त्याच्या एका कडेला तो अगस्तिवृक्ष निश्चळ उभा आहे,
आणि वटपूर्णिमेचा चन्द्र अगस्तीची एक फांदी धरून
हळूच खालीं उतरत आहे.
आजूबाजूचे महाल शान्त आहेत—
खिडक्या लागलेल्या आहेत—
दिवे मालवले गेले आहेत—
आणि हे मानिनी, तुझ्याच शयनगृहाची खिडकी
तेवढी अर्धी उघडी आहे,
आणि आंत मंदसा दिवा जळत आहे,
हें आश्चर्य नव्हे काय!
त्या मंचकावर तुझा पती गाढ झोपला आहे,
त्याच्या श्वासांची लय संथ आहे,
त्याच्या ओठांवर तृप्तीचे काळेनिळे ठसे उमटले आहेत,
आणि त्याच्या अंगोपांगांतून अनिर्बंध शिथीलता निथळत आहे.
हे मानिनी, त्याच मंचकावर उजवा हात उशाशीं घेऊन
तूंहि निजली आहेस,
पण तुझ्या श्वासांतला आवेग अजून ओसरलेला नाहीं,
तुझ्या पापण्यांतली धग अजून निवालेली नाहीं,
तुझ्या ओठांतला ताण अजून उतरलेला नाहीं,
तुझ्या उरांतला साखरदाणा जरासा फुटला आहे
पण अजून तो विरघळलेला नाहीं,
आणि तुझी एकटक दृष्टी समोरच्या खिडकीवर
अजून खिळलेली आहे.
परंतु हे मानिनी, खिडकीच्या त्या अर्ध्या उघड्या
फटींतून तुला तो अगस्तिवृक्ष दिसत आहे,
पण त्याच अगस्तीची फांदी धरून
हळूच खालीं उतरणारा
तो वेडा चन्द्र मात्र दिसत नाहीं,
हें आश्चर्य नव्हे काय!

— रॉय किणीकर

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

दिसूंच नये म्हणून तिच्या अंगापुरताच काळा बुरखा घालून तिला भूत बनवणे हाच शिष्टाचार आहे. असा फरक आपल्या भारतांतील प्रांताप्रांतांतही दिसेल. उत्तर हिंदुस्थानांत स्त्रीनें चारचौघांत बसून पानें खाणें हें वावगे समजत नाहींत तर महाराष्ट्रांत एकादी स्त्री तसें करील तर कदाचित ती घसरलेली असावी अशा समजुतीनें ते अशिष्ट ठरेल. स्त्री-पुरुषांनीं एकमेकांच्या कमरेला विळखे घालून अंगाला अंग चिकटवून खुशाल भरसभेंत नाच करणें ही एका ठिकाणची रीतच आहे तर शेजारच्याच इमारतींत नुसत्या परपुरुषाच्या हस्तस्पर्शानेंही पावित्र्य नष्ट होते अशा समजुतीचे लोक आहेत. मग आतां या समजुतीच्या कोलाहलांत कोणते अश्लील आणि कोणते श्लील हें ठरवायचें कसें ? याचमुळें अश्लीलता ही ज्या त्या समाजाची वेगवेगळी मनोधारणा झाली आहे.

हिंदुधर्मातील चातुर्वण्य पद्धतीमुळें वेगवेगळ्या जातीचे स्वतंत्र समाज बनले. ब्राह्मणांनीं तर इतरांना अन्य जाति ठरवून आपला सांस्कृतिक सवतासुभा निर्माण केला.

हिंदुधर्मातील भिन्न शिष्टाशिष्टतेंतील हा फरक कसा आहे तो पहा. एकाद्या मराठा क्षत्रीय जातीनें कापून, कातडे सोलून उलटे टांगून ठेवलेलें बकरें एकाद्या पोक्त ब्राह्मण गृहस्थाला अत्यंत बीभत्स वाटेल, पण तेंच अन्नान्नदशा झालेला शूद्रवर्णीय माणसाला आसुसलेल्या दृष्टीनें पहाण्याचें दृश्य होईल.

" आरं भडव्या " या शिवीचा अर्थ या इतर वर्गातील स्त्रियांच्या मनांतून रुजुनच गेला आहे. पण तेंच एकादी ब्राह्मण स्त्री ही शिवी ऐकेल तर डोक्यांतून कळ निघाल्यागत ती सूस् करील.

उसांत पाणी पाजतांना एकाद्या शेतकरी वर्गाच्या स्त्रीच्या संपूर्ण मांड्या दिसतील असा मांड–कासोटा घालणें त्या वर्गाला विशेष नाहीं, पण तशी होऊन एकादी ब्राह्मणस्त्री बाहेर पडली तर त्या वर्गांत ते अशिष्ट आणि कदाचित् अश्लीलही ठरेल. याच्या उलट एकाद्या ब्राह्मण स्त्रीप्रमाणें एकादी शूद्र तरुणी वेणीफणी करून, पायांत चपला घालून गांवांत कांहीं विकत घ्यायला गेली तर तिचे आईबाप किंवा सासूसासरे "आम्हाला काय धंदा काढायचा आहे का ? " म्हणून तिला दटावतील. ब्राह्मण वर्गाच्या लग्नांत लवंगेचे विडे तोडण्याचा प्रकार या 'अन्य जाती' अश्लील म्हणून आपल्यांत आणूं द्यायच्या नाहींत. तर अन्यजातींत नवरीला नवऱ्यानें काखेंतून घेऊन जाणें हें ओंगळ म्हणून ब्राह्मणवर्ग स्वतःत येऊं द्यायचा नाहीं.

ही अश्लीलता आपल्या तमाशांत कशी आणि कोणकोणत्या कारणांनीं येते हें आतां पाहूं.

पहिलें कारण लोकांना पुराणांतील उत्तान शृंगार चालतो पण आज दाखवलेला त्याहून कमी भडक शृंगारही चालत नाहीं हें. ह्या कालमानाच्या फरकांत एकटा तमाशाच सांपडलेला नाहीं. नाटकें चित्रपट इतकेंच काय, कांहीं नामवंत मासिक साप्ताहिकेंही लोकांच्या या चमत्कारिक समजुतींत सांपडलेलीं आहेत. कांहीं वर्षांपूर्वी अशा एका नामवंत मासिकावरील मुखपृष्ठ चित्राबद्दल मराठींत झगडा झाला होता. तमाशा सोडून इतर साहित्यप्रकार जुन्यालाहि स्थान देतात आणि नवीन पुरोगामी विचारसरणीही घेतात. परंतु तमाशा ही शुद्ध मराठीची अलीकडची कला आहे. त्यामुळें या भरडणींत जे सगळेंच प्रकार सांपडतात त्यांत तमाशाही सांपडतो. लावणी वाङ्मय निर्माण होण्यापूर्वीचे साहित्य पाहिलें तर ते एक तर संस्कृतमधून आलेले किंवा स्वतंत्र रचलेले असले तरी जुन्या पंथाच्या भक्ती प्रकाराचे. त्यामुळें हे नवीनच आलेले लोकांनीं ओंगळ ठरविलें.

संस्कृतांतून आलेली पुराणांतील अश्लीलता सोडली तरी भक्तिपरतेच्या नांवाखालीं अगदीं तशीच असलेली अश्लीलता समाज चालवून घेतो, नव्हे म्हाताऱ्या बापाबापड्याही वाती वळत त्या माना डोलवून चांगलेंच म्हणून ऐकून घेतात. एकनाथाचा कुंटिण हा भारुड ळळितांतून अनेक वेळां होतांना दिसतो. त्यांतल्या या ओळी पहा.

वासनेचे कंचुक सोडियले ।
मायामय कुच हे मर्दियले ।
जीवशिव मिठी घाली धरी आवळून ।
करून ऐक्यता माझें चुंबिले वदन ।
अलक्ष्य पदार्तींत घातले आसन ।
देहातींत भोगिला भोग त्याणे ।
एका जनार्दनी भोळी नारी ।
परपुरुष भोगी निरंतरी ।

त्यांच्या कोल्हाटीण या भारुडांतही असाच प्रकार आहे. तुकारामाच्या एका अभंगांत—

" भले तरी देऊ कांसेची लंगोटी " अशी ओळ आहे. ती चालते. तमाशांत मात्र अशाच स्वरूपाचे कांहीं आले कीं एकदम अश्लील अश्लील अशी ओरड उठते. जगन्नाथपुरीच्या, देवालयांतील संभोगाचीं चित्रें ईश्वरभक्तीच्या नांवाखालीं भक्तिभावानें पहायचीं, त्यांचे कौतुकही करायचे, तमाशांत तसे वर्णन केलें तरी तें वाईट ठरायचे. बरें, असा तरी प्रकार आहे काय कीं, पुराणांतील अश्लीलता पतीनें आपल्या धर्मपत्नीशीं ठेवलेल्या संबंधांतीलच आहे ! तसेंहि नाहीं, राधा ही अनया गवळ्याची बायको. कृष्णाशीं तिचा चाललेला दाट शृंगार या भाविकांना कसा चालतो ! दक्षकन्या पार्वती हिचे शंकराशीं लग्न होतांना ब्रह्मयानें तिचें नुसते नख पाहिलें आणि त्याचे स्खलन झालें; त्यांतून साठ सहस्र ऋषि निर्माण झाले; अशाच शंकराच्या स्खलनापासून अष्ट भैरव निर्माण झालेल्याची कथा आहे. खेड्यापाड्यांतल्या पुराणांत अशा कथाभागांची रसाळ वर्णनें आलीं कीं ती फोडून अर्थ सांगणारालाही 'कसे सांगूं' असें वाटून ती " स्तुति आहे " असें सांगून तो कथा पुढें ढकलतो !

एकूण काय, आमच्या समाजाला जुने कितीही घाणेरडे असले तरी तें पवित्र मानून कवटाळायचे पण तशासारखे जर नवें आलें तर तें खपवून घ्यायचें नाहीं अशी सवयच आहे. या सवयींत इतर कलाप्रकाराप्रमाणें तमाशाही सांपडला आहे.

तसे का होते यालाही कारण आहे. त्या कारणाचा शोध घेत गेलों तर आपणाला दिसून येईल कीं तमासगीर सरळ मराठी भाषेंतील शब्द वापरतो आणि हरिदास तेंच संस्कृतप्रचुर भाषेंत लोकांना सांगतो. एक तर मराठीची प्रकृतीच भडक कडक आहे म्हणावे लागेल किंवा मराठी बोलणारा शिष्ट समाज अजून संस्कृत भाषेच्या कचाट्यांतून सुटला नाहीं असें म्हणावें लागेल. कसें तें पहा.

शिष्ट लोकांच्या प्रशस्त मराठी भाषेंत १/३ संस्कृत किंवा संस्कृतचे तत्सम आणि तद्भव शब्द येतात. हे शब्द अधिकांत अधिक टाळून एकादा जर मराठी बोलूं लागला तर तो बराचसा मराठी खेडुतासारखा बोलेल, नाहींतर बोलायचाच नाहीं. ह्याचे उत्तम उदाहरण घ्यायचे झाले तर आरोग्य शास्त्रावरील एखादा

[ पान ३२ वर पहा ]

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



**जुन्यांतलें सोनें**

कै. अच्युत बळवंत कोल्हटकर यांनींच मराठी वाचकाला पैसे खर्चून वृत्तपत्र विकत घेण्याची व वाचण्याची संवय लावली. स्वदेशभक्तीनें भारावलेल्या अच्युतरावांसारख्या कल्पक व शैलीकार पत्रकारानें संदेशमधून जें विविधरंगी लेखन केलें तें वाचून आजहि मन थक्क होतें.

'होमरूल लीग' या स्त्रीनें भ्रतार 'मो. क. गांधी' यांना दिलेली ही नोटीस म्हणजे अच्युतरावांच्या कल्पकतेचा व विनोदी वृत्तीचा एक उत्कृष्ट नमुना आहे.

# "नवरा-बायकोमधील नोटीस !"

रा. रा. मोहनदास करमचंद गांधी, राहणार दुनिया, हल्लीं मुक्काम मुरादाबाद, संयुक्तप्रांत, प्राव्हिन्शियल कॉन्फरन्सचा मंडप, डेलीगेट कॅम्प, यू. पी., इंडिया ह्यांस—

खालीं सही करणार होमरुल लीग, भ्रतार मोहनदास करमचंद गांधी, राहणार फोर्ट, मुंबई (हिंदुस्थान) इजकडून नोटीस देण्यांत येते कीं तुम्ही माझे लग्नाचे नवरे असून तुम्हीं गेले दोन महिन्यापासून मला आपले घरीं नांदणेस नेत नाहीं. मला माझे भाऊ महंमदअल्ली जिना वगैरे माझ्या माहेरच्या माणसांनीं लोकांचे कर्ज काढून पन्नास हजार रुपये खावयास घातलेले आहेत. माझे वडील दादाभाई नवरोजी आणि माझी आई कलकत्याची १९०५ ची कॉंग्रेस, ह्या दोघांची मी सुस्थळीं पडावें अशी इच्छा होती. माझी आई सुरत येथें वारली तेव्हां तिनें मला माझे बाबा दादाभाई नवरोजी ह्यांच्या स्वाधीन केलें व त्यांनींहि मरणाचे वेळीं माझे वडील बंधु महमदअल्ली जिना वगैरे मायाळू आतांना माझ्या लग्नाची काळजी करण्यास सांगितलें. महंमदअल्ली जिना यांनीं माझ्याकरतां पुष्कळ खर्च केला व पुष्कळ स्थळें पाहिलीं. एकदां तर त्यांनीं माझें लग्न ॲनिबेझण्ट नांवाच्या व्यक्तिशींच लावून दिलें, पण पुढें ही व्यक्ति स्त्री आहे, पुरुष नव्हे, अशी शाबिदी झाल्यावरून तें माझें लग्न रद्द ठरलें. पुढें त्यांनीं तुमचे कुलशील व तुमची कीर्ति ऐकून माझें तुमच्याशीं लग्न लावून दिलें. परंतु करीब दोन महिने झाले तुम्ही मला नांदणेस नेत नाहीं व स्वराज्यसभा नांवाच्या एका दुसऱ्या औरतेच्या नादीं तुम्ही लागला आहांत असें माझ्या भावास खात्रीपूर्वक कळलेलें आहे. ह्या औरतेचा नाद सोडून द्या असें त्यांनीं तुम्हांस नाना प्रकारानें सांगितलें, पण तुम्ही तो नाद सोडून देत नाहीं. तुम्ही ब्रिटिश राज्यछत्राखालीं सुद्धां राहण्यास तयार नाहीं असें माझे भाऊ मला सांगत आहेत. हें खरें असेल तर तो तुमच्या नांवाला बट्टा आहे. निदान मला तरी तुम्ही ब्रिटिश राज्यछत्राबाहेर रंगढंग करीत असतांना तुमच्याबरोबर एकटीला रहाणें शक्य नाहीं. शिवाय तुमची दुसरी औरत स्वराज्यसभा हिला तुम्ही सोडायला तयार नसाल तर मला तुमचेबरोबर रहाणें शक्य नाहीं. कारण ती म्होतुरची असल्यामुळें माझ्यापेक्षां तिचा दर्जा कमी आहे व तिचीं लुगडी धुवून राहण्याचा तुम्ही मला हुकूम करणार आहांत असें माझे दूधभाऊ जमनादास द्वारकादास, मावजी गोविन्दजी वगैरे मंडळी मला सांगत आहेत, परन्तु तिची लुगडीं धुवून तुमच्याजवळ रहायला मी कबूल नाहीं. मी आतां वयांत आलेली आहें व संसार करून दोन मुलेंबाळें व्हावीं असें मला वाटणें साहजिक आहे. माझे भाऊ महंमदअल्ली जिना ह्यांनीं आजवर माझ्याकरितां फार खर्च सोसलेला आहे. आतां ह्यापुढें माझ्याकरितां तसदी सोसण्याची त्यांची ऐपत नाहीं. व मलाही आतां यापुढें त्यांना तकलीफ द्यायची इच्छा नाहीं. मला कोणी स्वतंत्रपणानेंहि कर्ज देत नाहीं. ह्यासाठीं मला दुसरा संबंध करून माझ्या जन्माचें सार्थक करणें भाग आहे. तरी ही नोटीस पोचल्यापासून आठ दिवसांचे आंत वरील रक्कम पन्नास हजार रुपये देऊन मला नान्दविणेस घेऊन जावें. शिवाय तुम्हीं ठेवलेली दुसरी औरत स्वराज्यसभा हिला ह्यापुढें घरांत ठेवणार नाहीं अशाबद्दल पंडित मदनमोहन मालवीय व बाबू विपिनचंद्र पाल असे दोन लायक जामीनहि द्यावे. तुमच्याजवळ अलीकडे मौलाना महंमदअल्ली, मौलाना शौकत अल्ली असे दोघे इसम रहात असतात असेंहि मला कळलें आहे, आणि विशेषतः त्यांच्याच नादानें तुम्हीं बिघडलेले आहां नाहींतर पूर्वी तुमचें माझ्याशीं व जगाशीं वर्तन चांगलें होतें, ह्या दोघांशिवाय दुसरी जामिनगिरी तुम्ही द्याल तर मी ती कबूल करणार नाहीं, जामिन द्याल तर ते मदनमोहन मालवीय व बिपिनचन्द्र पाल हे दोघेच दिले पाहिजेत. तसें न कराल तर हीच सोडचिठ्ठी समजून मी दुसरा नवरा करीन. मग मजवर तुमचा नवरेपणाचा कोणताही हक्क चालणार नाहीं.

कळावें, ता. ४–१०–१९२० इ.

निशाणी बांगडी इंडियल होमरुल लींग.

भ्रतार मोहनदान करमचंद गांधी

इचो असे.

दस्तुर बॅरिस्टर आझाद, मुंबई.

• • •



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

[ पान ३० वरून चालू ]

लेख एकाद्या मासिकांत आलेला पहावा. स्त्रीपुरुषांच्या ब्ऱ्याच इंद्रियांना संस्कृत नांवें वापरल्याशिवाय त्याचे चालतच नाहीं. का बरें ? त्यानें तिथें शुद्ध मराठी शब्द वापरले तर काय होईल ? दवाखान्यांत एकादी मराठी नर्स बाळंतपणाचे वर्णन करताना जर ऐकणारा चांगला इंग्रजीचा जाणता असेल तर ती बरेंच शब्द इंग्रजीतून सांगेल. इंग्रजी जाणणारा नसेल तर नुसती दूरान्वयानें माहिती सांगेल. असें का बरें ? कारण अशा गुप्त इंद्रियांची नांवें मराठींतून सांगितली तर तें अश्लील होईल असें तिला वाटत असते. ही नांवें संस्कृतमधून येतांच श्लील आणि मराठींतून येताच अश्लील असें का होते ? संस्कृताशिवाय मराठींत तशी नांवे नाहींत म्हणावें तर ती आहेत हे सर्वांना माहित आहे. मग मराठींतून तीं बोलायची भीति का ?

याचें कारण, जी खरी मराठी आहे ती गावंढळ लोकांची भाषा आहे या समजुतीचा अंश अद्याप या शिष्ट लोकांच्या डोक्यांत घोळतो आहे. याचे एक उदाहरण देतां येईल. मराठी भाषा बाल्यावस्थेंत असतानाचा शके ११०९ मधील परळ येथील शिलालेख मराठी भाषेचे इतिहासज्ञ आधाराला घेतात. या शिलालेखांत एकूण साडेचोवीस ओंळी आहेत. त्यांतील साडेएकवीस ओळी श्री. वैद्यनाथ देवाला साष्टी जवळील उत्पन्न दिल्याबद्दल संस्कृतमध्यें आहेत. हें सामान्य लोकांना कळावें म्हणून शेवटीं दोनतीन ओळी मराठींतसुद्धां खोदलेल्या आहेत. त्यांत शेवटची ओळ, ही आज्ञा मोडेल—

" तेहाची माय गाढवे ×××

अशी आहे. फुल्यांच्या ठिकाणीं संभोगविषयक शुद्ध मराठी शब्द आहे. परंतु प्रतिष्ठितांच्या वाचकासाठीं तो इथें देतां येत नाहीं. असे सगळ्या मराठी लोकांचे होतें. जो मराठी शब्द म्हणून अगदीं शिलालेखावर खोदला तो अश्लील म्हणून आम्हीं वापरूं शकत नाहीं. त्या ऐवजी " संभोगविषयक " असें म्हणून संस्कृतच्या आडोशाला पटकन उडी मारायची गरज पडते.

तमाशांत अश्लीलता ज्या ज्या कारणांनीं येते त्यांत हें एक महत्त्वाचे कारण आहे कीं तमासगीर सरळ मराठी शब्द वापरतात, आणि शिष्टाना ते अश्लील वाटतात. तशी मराठीची प्रकृति मुळांतच उग्र आणि टणक आहे. जसा मराठ्यांचा देश दगडाधोंड्यांचा तशी त्यांची भाषाही टणक कणखर. मागें एकदां लावणी मराठी प्रदेशाच्या भौगोलिक रचनेसारखी असल्याचे आपण पाहिलें होते. मराठी भाषाही तशीच आहे. एकच मस्तकाबद्दलचा शब्द घेऊन तो मराठींत कसा येत गेला तें पहावें म्हणजे हें आपोआपच कळून येईल.

मस्तक—( संस्कृत )
माथा—( शिष्ट मराठी )
डोई—( शिष्ट मराठी )
डोके—( शिष्ट मराठी )
डोस्कं डोचकं—( खेडूत मराठी )
टकुरं टक्कुरं—( गांवढळ मराठी )

अशा रीतीनें 'मस्तक'पासून 'टक्कुरं'-पर्यंत येतांना मराठीची प्रकृति जाणून घेतां येते. भाषेच्या घाटामुळें अश्लीलता कशी येते तें कळण्यासाठीं एक शृंगारविषक वाक्य घेऊन तें गांवच्या मराठीपर्यंत पोहोचवून पाहूं.

तिला आलिंगन दिलें. ( संस्कृत वळणाचें वाक्य )
तिला मिठी मारली. ( शुद्ध मराठी )
तिला आवळले. ( शुद्ध मराठीसारखे )
तिला आवळली. ( स्पष्ट मराठीतील विनोद )

यांतील पहिल्या वाक्यांत 'आलिंगन दिले' यांत पावित्र्य वाटेल. पण शुद्ध मराठींत तमासगिरानें 'आवळली' म्हणताच शिष्टांना ते अश्लील वाटेल.

अशा रीतीनें मराठीची प्रकृतीच उग्र आहे. शृंगार सरळ धोपटमार्गी शुद्ध मराठींतून सांगताना आपल्या कानांत अश्लील वाटतो. " दंतव्रण गालीं " हें संस्कृत वळणाचें भिवया उडवून ऐकायला बरें वाटते तेंच " गाल चावला " म्हणतांच कसें तरी होतें. याचा अर्थच असा की मराठीचा स्वभाव जें आहे ते बेधडक सरळ सांगण्याचा नाहीं काय ? चक्क मराठींतून सांगताना पुन्हां ते अधिक कडक भडक किंवा अमर्याद वाटते यांत केवळ तमाशाला किंवा तमासगिरांना कितपत दोष देतां येईल ? या म्हणण्यांची सत्यता स्वतःची स्वतःला पटवून घेण्यासाठीं कुणीही साहित्यिकानें एकही संस्कृत शब्द येऊं न देतां आपल्या नायकाला नायिका कशी दिसली याचे शुद्ध मराठींत वर्णन करून पहावें. मग तो साहित्यिक लावणीला बहुतेक अश्लील म्हणायचा नाहीं. अगदीं मराठी वळणाची पद्यरचना असें तिला तो म्हणेल. इतके कशाला कुणीही पुढें दिलेल्या चारपांच संस्कृत शब्दाचे त्याच्या अर्थासह शुद्ध मराठी घाटाचें भाषांतर करून पहावें.

नितंबिनी.

उरोज.

दासीपुत्र.
गर्भादान.
शरीरसंबंध.

या शब्दांचे एकेक सरळ मराठी भाषांतर केल्यास एकेका शब्दोच्चारासोबत 'अश्लील अश्लील' म्हणून शेजारून कुणीतरी ओरडत उठेल आणि तरी हे शब्द साध्याच वळणाचे आहेत.

पुन्हां एवढ्यानेंच भागत नाहीं. असा सरळ मराठींतून द्यायचा शृंगार तमासगिराला कुणापुढें दाखवायचा असतो ? खेडेगांवच्या ग्राम्य लोकांपुढे. ग्रामवासी लोक हे बहुतेक अडाणी, गांवढळ किंवा असंस्कृत असतात. असा एक नियमच सांगतां येईल कीं एकादा समाज जितका अधिक असंस्कृत तितका त्याला संयम कमी असलेला सदैव दृष्टीला पडतो. इतिहासांत जों जों मागें जावें तों तों स्त्री-पुरुषांनीं अंगावर वस्त्रेंही कमी कमी घातलेली दिसत जातील. म्हणजे संस्कृति जितकी जुन्या काळची तितकी लज्जाही कमी. आणि संयमही कमी. खेडीं अजून जुन्या काळांतच जगताहेत. अशा कमी संयमाच्या लोकांना सरळ मराठींतून हा शृंगार दाखवतांना कलाकारालाही रसिकाप्रमाणें व्हावेंच लागते. त्यामुळें तमाशांत अधिक स्पष्ट असलेल्या मराठी शृंगारला अधिक भडकपणा आला. असा भडकपणा शिष्ट वर्गांना ओंगळ वाटत गेला. त्यावरही गावंढळ लोक बोट शब्दाचे " ब्वाट " पोट ह्याचे " प्वाट " डोंगरचे "डोंगुर" चंद्रसूर्य याचे "चंदरसूर्व्या" असे अधिकच उग्रप्रकार करतात. संयम नसलेल्या शृंगाराला अशा नेहमींच्या बोलीभाषेचे उग्रत्व आले की मुळचा अशिष्ठतेचा भास अश्लीलांत जाऊन उभा रहातो. अशा रीतीनें तमाशा ही गांवकरी लोकांची कला आहे हेही तो





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अश्लील वाटायला एक कारणच घडले आहे, म्हणावें लागेल.

यापुढचें चौथें कारण असे आहे कीं तमाशा म्हटले कीं तो अमंगलच असतो असा समाजाचा झालेला समज. एकाद्यावर चोरटेपणाचा शिक्का बसतांच त्याची कोणतीही कृति सर्वजण जशी संशयानें पाहूं लागतात तसें तमाशाच्या बाबतींत घडलें आहे. तमाशा अश्लील म्हणून एकदां जो कानफाट्या ठरला तो ठरलाच. मग त्यांत साधेंही कांहीं आलें तरी तें तमाशांतले म्हणून अश्लील मानण्याची किंवा त्यांतून अश्लीलता हुडकून काढण्याची लोकांना संवय लागली. कांहीं कांहीं शब्दांना त्यामागील अर्थाचे किंवा त्याच्या स्वरूपाचे एक वलयच निर्माण झालेले असते. कीर्तन म्हणताच त्याला ईश्वरभक्तीचा वास येतो. मग कीर्तनांत एकाद्या हरिदासानें कांहीं चावट गोष्ट सांगितली तरी भाविक मंडळींनीं विनोद म्हणून त्याला हंसावें. आणि तमाशांत तमासगिरांनीं एकादा सरळ विनोद केला तरी तो अश्लीलच असला पाहिजे अशा खवचट अर्थानें बवे मंडळींनीं तो घ्यावा, असा प्रकार झाला आहे.

वास्तविक आजकालचे चित्रपट, नाटकें, कादंबऱ्या, ध्वनिमुद्रिका खेड्यापाड्यांतील लळितें आणि पुराणपारायणेंसुद्धां यांतून बऱ्याच वेळां तमाशाला लाजवणारी अश्लीलता किंवा अशिष्टता असते, परंतु ती सहजासहजीं चालून जाते. तमाशाला मात्र तशाच प्रकारासाठीं कायमचा बदनाम करून टाकला आहे. चित्रपटांतून 'सेक्स अपील' च्या नांवाखालीं केवढ्या भयानक गोष्टी दाखवल्या जातात. एकाद्या वकीलानें एकाद्या पोरीचा रस्त्यावर पदर धरलेल्याचीं गाणीं आम्हीं सिनेमांत मिटक्या मारत ऐकायचीं, तसेंच तमासगीर दाखवील तर त्याला आम्ही "असें कधीं होते काय ? अडाणी बेटे", असें म्हणून हंसायचें. स्तनांचा उठाव, अगदीं

( पान ४० वर पहा )

( पान २६ वरून चालू )

कल्पना माणसाला इतकी अनपेक्षित व गतीनें सुचते कीं त्या कल्पनेच्या मागून त्यालाहि धावणें अशक्य होतें. त्यांच्या मनांत आलें कीं निरंजन मुळांत आपल्याकडे आलाच कशाला ? देवाच्या शोधाचें थोतांड तर त्यानें उभें केलें नसेल ? परमेश्वराच्या शोधाच्या पड‌द्यामागून तो फक्त आपल्या पहायला तर आला नसेल ? आणि शिवा नसता नी त्या गांधीचे पालक नसते तर कदाचित् पुन्हां आपल्यावर कठिण प्रसंग तर आला नसता ? विजेचा पंखा सुरू केला कीं गति घेतां घेतां तो इतकी गति घेतो कीं तो उलट गतीनें फिरतो असें दिसूं लागतें. मालतीबाईच्या मनानें अशी क्षणभर उलट गति घेतली खरी; पण क्षणभरच. परमेश्वराचा अनुभव सांगतांना त्याचा उजळलेला चेहरा त्यांना आठवला. तो खोटें बोलत नव्हता. मग तो आला तरी कशाला ? आपल्याला हिणवायला ? पण वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षीं संन्यास ? पहिल्या पंचविशीच्या पायरीवर परमेश्वराचा अनुभव या वयांत हें सुंदर जग दूर लोटून ? जडवादाच्या सीमेवर पोंचलेल्या ह्या विसाव्या शतकांत संन्यास ?—एकामागून एक घाव मारावे तसे ते प्रश्न त्यांच्या मनावर आदळूं लागले.

त्यांतच त्यांनीं निश्चय केला, निरंजनची भेट घ्यायची. त्याचें हें देवाचें सोंग त्याच्या पुढें उलगडून टाकायचें. पण त्याला शोधायचा कुठें ? तो भेटणार कुठें ? आपण त्याला परत बोलावला होता. त्यानें यायचें कबूल कुठें केलें होतें ? यावेळीं तो असणार तरी कुठें ?

एवढ्या मोठ्या शहरांत तो सांपडावा तरी कसा ? तरी मालतीबाईच्या मनानें ठरवलें कीं खूपखूप हिंडायचें, तो कुठेंतरी सांपडेल. तो व आपण ज्या टेकडीवर फिरलों होतों त्या टेकडीवर तरी तो असेल ! आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो तिथें त्यांना भेटला. सायंकाळच्या वेळीं मावळत्या सूर्याकडे पाहात एकाग्र मनानें कसलेंसें चिंतन करीत बसलेला त्यांना तो आढळला. त्याच्या अगदीं नजिक येऊन पोंचलेल्या बाईकडे त्याचें लक्ष नव्हतें. त्यांचें अस्तित्वच त्याच्या क्षितिजगणतींत नव्हतें.

" Mr. Datar " त्यांनीं दोनदां हांक मारली.

" अरे " त्यानें चमकून मागें पाहात म्हटलें "~~तुम्हीं~~ madam."

" हं सकाळीं तुम्हांला मधेंच जावं लागलं—"

" तुम्ही मला परत बोलावलं होतं कीं; नी मी येणारहि होतों."

तुमचा सूर जरा बेफिकिरीचाच वाटला मला. म्हणून म्हटलं—"

तो हंसला. त्या हास्यांत मागच्या अनेक आठवणी नव्या रूपानें जागृत होत होत्या. तरी मनावर ताबा ठेवीत त्या म्हणाल्या.

" निरंजन, तुम्ही नक्की कशाला आलां होतांत सकाळीं ? "

" माझा अनुभव सांगायला. "

" खरं ? "

" खरं ! " त्यांचाच प्रश्न पुन्हां उच्चारीत तो म्हणाला, " खोटं कशाला सांगूं मी ? " आपल्या विचित्र प्रश्नानें आपल्यालाच अडकवलें हें कळल्यामुळें विषय बदलण्यासाठीं बाई म्हणाल्या,

" तुमचा अनुभव ऐकायला उत्सुक आहे मी. केव्हां येतां ?



" संशय खट झोटिंग महा "

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

"यायला कशाला हवं?" त्यांच्याकडे पाहात तो म्हणाला, "त्याचं असं आहे madam, मी हा अनुभव कां सांगतोय माहीत आहे का?"

"मला कसं ठाऊक असणार तें? पण वैफल्यानें पछाडलेलीं माणसं"

"वैफल्य? कसलं वैफल्य?"

"यशाचं, कीर्तीचं प्रीतीचं—हीं सारीं माणसाला देवकल्पनेकडे खेचून नेतात"

"तुमचं सारं पुस्तकी ज्ञान झालं!" त्याचा हा अनपेक्षित टोमणा मालतीबाईंना फारच लागला. "मी देवाकडे वळलों तो वैफल्यानें नव्हे. माझ्या स्वभावांतच होतं"

"अस्सं" मालतीबाईंच्या उद्गारांत अविश्वास होता. त्यांना वाटलें कीं या दांभिकाला त्या प्रणयप्रसंगाची आठवण करून द्यावी.

"तुमचा विश्वास नाहीं माझ्या बोलण्यावर! तें जाऊं दे. मी वाद नाहीं घालीत अलीकडे."

"एकेकाळीं तर पावलोपावलीं वाद घालायचे तुम्हीं."

"अनुभवशून्य मनुष्य असंच करतो."

"बरं बाई; हा वाद जाऊं दे; निरंजन तुम्ही काय सांगणार होत्यांत!"

"एके [illegible] मी गुहेंत बसलों आहें...साऱ्या इंद्रियांचं बळ मी माझ्या मिटलेल्या डोळ्यांत आणलं आहे. साधकाच्या सोयीसाठीं मुरलीधर कृष्णाचं रूप मी समोर धरलं आहे, मी बसलों आहे गुहेंत, पण त्याचवेळीं मी अंतराळांतून सूक्ष्म होऊन संचार करतों आहें. ते भरलेले सूर दूरवरून जवळ येत आहेत तो अनुभव—तो अनुभव—तें सत्य आहे. स्वप्न नाहीं याची मला प्रचीति क्षणोक्षणीं येते आहे." निरंजनच्या बोलण्यामागें प्रचीती जाणवत होती बाईंना. तो सांगत होता.

"तें सत्य मला तपासायचं आहे. तो अनुभव परत घ्यायचा आहे. आज चार महिने झाले. तो अनुभव परत यावा असं वाटतं; पण नाहीं. तें मात्र माझं वैफल्य खरं. तो अनुभव तर्कावर टिकणारा नाहीं. पण तो खरा आहे."—मालतीबाईकडे वळत तो पुढें म्हणाला,

"बाई, परमेश्वर हा अनुभव आहे, तर्कानें सिद्ध होणारा नाहीं हें ज्ञान मला तुमच्यामुळें प्रथम झालं. मी जगतों आहे आज तो केवळ त्या तुमच्या मतामुळें God is an experience entirely personal. नाहींतर तो परत न येणारा अनुभव—तो पुन्हां न गवसणारा क्षण—त्या क्षणामागें, अनुभवामागें धांवतां धावतां मी वेडा झालों असतों."

त्याच्या निवेदनानें मालतीबाईंना एकदम लहान करून टाकलं. या अनुभवाच्या मागें वेड्या झालेल्या माणसाला आपण केवळ प्रीतिपिसाट समजत होतों हा आपल्या मनाचा केवढा क्षुद्रपणा? त्या दोघांच्या बोलण्यानंतर परततांना क्षणभर त्यांना वाटलें कीं आतां आपलें मन निवांत होईल. त्या साक्षात्कारी पुरुषाच्या मनांत आपण नाहीं. आपल्यासाठीं त्यानें केलेलें प्रणयाराधन नाहीं. तें सक्तीचें उन्मादक चुंबन नाहीं. तो केवढा उंच? अनुभवानं त्याची उंची तर अधिकच वाढलेली व क्षुद्र कल्पनांनीं आपण क्षणोक्षणीं अधिकच थिट्या पडत आहोंत. रात्रीं विचार करतां करतां त्याच्या आपल्या विश्वांत पडलेल्या अंतराची त्यांना जाणीव झाली...त्या जाणीवेनंतर तरी मनाला शांतता यावी होती.

तसें व्हायचें नव्हतें हेंच खरें. त्याचे शेवटचे शेवटचे शब्द आपल्याभोंवतीं गरगर फिरत घुमताहेत असा त्यांना भास झाला. 'त्या क्षणामागें धांवतां धांवतां मी वेडा झालों असतों'—वेडा, वेडा, वेडा!!!—ह्या शब्दानेंच फक्त आतां त्यांची पकड घेतली. त्यांना वाटत होतं कीं आपण दूर लोटल्यामुळें तो वैफल्यानं देवाकडे झुकला असावा. आतां एक नवाच विचार रंगरूप घेऊं लागला. निरंजन पुरा वेडा तर झाला नसेल? वैफल्याहूनहि भयंकर अशा मनस्थितींत तर तो गेला नसेल? त्याच्या ह्या साऱ्या शहाणपणामागें प्रचंड वेडेपण तर नसेल? आणि या वेडाच्या मागें आपण तर नसूं? त्यानें धिटाईनं आपलें चुंबन घेतलें. त्याला आपण दूर लोटला. यामुळें तो पार वेडा तर झाला नसेल?

त्याच्या वेडाच्या कल्पनेनें आपल्यालाच वेड लागेल कीं काय अशी त्यांना भीति वाटूं लागली. आपणांमुळें एका तरुण पुरुषाला वेड लागलें याची त्यांना खंत वाटूं लागली. आपणामुळें लागलेलें वेड आपणच घालवूं शकूं. त्याची वेडगळ संन्यासी वेषभूषा आपण उतरवूं व त्याला परत पूर्वींसारखा करूं अशी त्यांना हळुहळू खात्री वाटूं लागली. त्याला जवळ केला पाहिजे. तो असलं पिसाटासारखें बोलूं लागला तर दीर्घ चुंबनानें त्याला मुका केला पाहिजे. कृष्णाच्या बांसरीचे सूर त्याला हवे आहेत. गाढ आलिंगनाच्यावेळीं वाजणाऱ्या बांगड्यांचे सूर त्याला माणसांत आणणार आहेत. त्याच्या अनुभवाची प्रत्येक छटा संभोगाच्या अनुभवाशीं समांतर आहे. आणि निरंजनचें वेड आपल्यामुळें आहे व तें आपणच घालवूं शकूं याची त्यांना खात्री वाटली. जो निर्णय त्यांना पूर्वीं घेतां आला नाहीं तो त्यांनीं आज घेतला. आपल्याकडे लोभसवाण्या प्रणयी भावनांनीं पाहणाऱ्या निरंजनचे डोळे आपण मिटले पाहिजेत. परमेश्वराचा शोध हें केवळ त्या मोहक सुखपूर्ण अनुभवाचें वेडेपणांतलें नांव आहे हा त्यांचा पक्का समज झाला.

आणि त्याला परत भेटायचें तेव्हां कसें बोलायचें. त्याच्या चुकलेल्या पहिल्या भेटीचा परत येणारा क्षण कसा समवायचा ह्या विचारांत जागृत वा निद्रित अवस्थेंत त्या रात्रभर होत्या.

पण दिवस उगवून मावळला, रात्र फुलून बावून गेली. सारें ऋतुचक्र नेहमींच्या ऐटींत, गतींत फिरत राहिलें. मालतीबाईंनीं टेकडीवर त्याची वाट पाहिली. पण तो आला नाहीं; त्याच्या व त्यांच्या पूर्वींच्या आठवणींच्या सर्व जागा हेरल्या. त्यांना निरंजन भेटला नाहीं. कोमल बाहूंच्या पाशांत त्याला शहाण्या करून टाकणाऱ्या बाईंना तो परत भेटला नाहीं. त्यांना एकदां वाटे, देवाच्या शोधांत तो कुठंतरी भरकटत असेल. कोणत्याहि क्षणीं शिवा येऊन सांगेल, "बाई बाहेर एक स्वामी आलाय."

आपण त्याला सांगूं, "जा शिवा, त्यांना आंत पाठवून दे तूं. कुणी आलं तर भेट होणार नाहीं म्हणून सांग."

त्यांच्या वेड्या आशेला फुलं धरलींच नाहींत. परमेश्वराचा अनुभव पुन्हां घेण्यासाठीं भटकणारा निरंजन पुन्हां भेटला नाहीं. तो परमेश्वराचा शोध करतोय् नीं मालतीबाई त्याचा शोध मनानं घेतघेत, मावळणारा दिवस, विरणारी रात्र असहाय्यपणें अनुभवताहेत.

• • •

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

# वर्षाव

‘ एन्काउंटर ’ या नामवंत इंग्रजी मासिकातर्फे आशियांतील लेखकांसाठीं नुकतीच एक लघुकथा स्पर्धा ठेवण्यांत आली होती. या स्पर्धेत श्री. अरविंद गोखले यांच्या ‘ गंधवार्ता ’ या कथेला पहिलें पारितोषिक मिळाल्याचें वाचकांना विदित आहेच. गोखल्यांच्या याच कथेबरोबर एका कोरियन कथेलाहि पारितोषिक मिळालें. या कथेचे लेखक आहेत वँग सून वॉन्. वॉन् हे सेऊल येथील एका विद्यापिठांत वाङ्मयाचे प्राध्यापक आहेत. कोरियन ॲकॅडमीचेहि ते समासद असून त्यांचें अनेक कादंबऱ्या, कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. त्यांचा मूळ कोरियन कथेचा इंग्रजी अनुवाद ‘ Shower ’ या शीर्षकाखालीं ‘ एन्काउंटर ’ च्या मे १९५९ च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्यावरूनच हा मराठी अनुवाद ‘ दीपावली ’ च्या वाचकांसाठीं येथें सादर केला आहे.



अनुवादक : सदानंद रेगे

ओढ्यापाशीं उभा असतांना त्यानं तिला पाहिली तेव्हांच त्यानं ओळखलं कीं, ही म्हाताऱ्या यूनची पणती म्हणून. ओढ्याच्या खळखळत्या पाण्यांत दोन्ही हात घालून ती खेळत होती. जणूं पहिल्यांदाच ती इतकं नितळ पाणी पहात होती.

गेले कित्येक दिवस शाळेंतून घरीं जातांना ती या ओढ्याच्या पाण्याशी खेळायला थांबत होती. पण कालपर्यंत ती कांठावरच उभी राहून पाण्याला गुदगुल्या करीत असे. आज अगदीं पाण्याच्या मधोमध एक दगड होता त्यावर बसून ती पाण्याला हात लावीत होती.

तिच्या परतण्याची वाट पहात कांठावरच बसून रहायचं त्यानं ठरविलं. तेवढ्यांत एक शेतकरी तिथं आला नि एकेका दगडावर पाय ठेवून ओढा ओलांडूं लागला. त्याला वाट देण्यासाठीं तीहि बसल्या दगडावरून उठून उभी राहिली. मग कांठावर तिच्या परतण्याची वाट पहात बसलेल्या त्या मुलानंहि तसाच ओढा ओलांडला व तो पलिकडच्या किनाऱ्यावर आला.

\+ \+ \+

दुसऱ्या दिवशीं जरा उशीरांच तो ओढ्यावर आला. प्रवाहाच्या मधोमध असलेल्या त्या नेहमींच्या दगडावर बसून ती तोंड धूत होती. तिनं गुलाबी रंगाचा स्वेटर घातला होता. स्वेटरचे दोन्ही हात वर दुमडून घेतले होते. तिचीं गोरी गोरी मनगटं नि गोरी गोरी मान उजळून निघत होती.

तोंड धुवून झाल्यावर ती पाण्यांतील स्वतःच्याच प्रतिबिंबाकडे



अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

पहात राहिली. मग तिनं ओंजळीनं पाणी उंच उडविलं—जसा कांहीं एखादा छोटासा मासाच तिला गवसला होता !

तो कांठावर उभा आहे याची तिला जाणीव असावी. कदाचित् नसावीहि. ती आपली संथपणें पाणी उडवीत बसली होती. आपल्या खेळांत ती अगदीं बुडून गेली होती. ओढा ओलांडायला कुणी आलं तरच काय ती उठायची. बाकी एक नाहीं नि दोन नाहीं.

तेवढ्यांत पाण्याच्या प्रवाहांत तिला एक पांढरी गोटी दिसली. पटकन् आंत हात घालून तिनं ती उचलली व दगडावरून टुणूटुण् उड्या मारीत ती पलीकडल्या कांठावर आली. कांठावर पाऊल टाकतां टाकतांच तिनं मागें वळून पाहिलं अन् त्या मुलाकडे पाहून ती म्हणाली, "ए वेड्या मुला !" एवढे शब्द तिच्या तोंडांतून बाहेर पडतात न पडतात तोंच तिनं हातांतील ती गोटी त्या मुलाच्या दिशेनं भिरकावलीहि.

गोटी आपल्या दिशेनं भिरभिरत आलेली पहातांच तो मुलगा दचकला. आश्चर्यचकित होऊन त्यानं तिच्याकडे पाहिलं, पण डोळ्याचं पातं लवायच्या आंतच ती पाठीवरची वेणी उडवीत वेळूवनांत घुसलीहि. पावसाळी ढगांतून पाझरणाऱ्या वस्त्रगाळ सूर्यप्रकाशांत वेळूंचीं पानें रेशमासारखीं सळसळत होतीं.

वेळूवनाच्या दुसऱ्या अंगानं एव्हांना ती बाहेर यायला हवी होती. पण बराच वेळ झाला तरी ती बाहेर येईना. मांजरपावलांनीं तो तिच्या मागावर निघाला. पण तेवढ्यांत पानांची सळसळ झाली अन् अलगद पावलें टाकीत अगदीं निवांतपणें बाहेर येतांना ती त्याला दिसली. तिच्या हातांत वेळूच्या पानांचा गुच्छ होता अन् झगझगीत सूर्यप्रकाशांत वेळूवनांतून बाहेर पडतांना तीहि त्याच गुच्छासारखी दिसत होती.

ती नजरेआड होईपर्यंत तो तिच्याकडे पहात राहिला. ती दिसेनाशी झाली तेव्हां तिनं आपल्या दिशेनं भिरकावलेल्या त्या गोटीकडे पाहिलं. एव्हांना ती वाळून कोरडी ठणठणीत झाली होती. त्यानं ती उचलली नि खिशांत घातली.

दुसऱ्या दिवशीं खूपच उशीरा तो ओढ्यावर आला. ती अजून आलेली नव्हती. त्याला तेवढंच बरं वाटलं. दुसऱ्या दिवशींहि ती आली नाहीं. त्याच्या दुसऱ्या दिवशींहि नाहीं. दिवसामागून दिवस जाऊं लागले अन् तरीहि ती ओढ्यावर येईना, तसतसा कसला तरी विचित्र एकाकीपणा त्या मुलाला भासूं लागला. या विचित्र रितेपणाचे ढग भोंवतीं जमूं लागले कीं आपोआपच त्याचा हात खिशांत जाई व त्या दिवशीं तिनं भिरकावलेली ती पांढरी गोटी तो कुरवाळूं लागे.

एक दिवस तो त्या पाण्याच्या मधोमध असलेल्या दगडावर आला नि त्या मुलीसारखंच त्यावर बसून तो तोंड धुवूं लागला. दोन्ही हाताची ओंजळ करून त्यानं पाणी घेतलं नि चेहऱ्यावर मारलं. मग त्यानं पाण्यांत डोकावून पाहिलं. उन्हानं करपलेल्या त्याच्या चेहऱ्याचं प्रतिबिंब पाण्यांत पडलं होतं ते ओंजळीनं उंच उडविण्याचा त्यानं प्रयत्न केला. तेवढ्यांत कसलीतरी चाहूल त्याला लागली म्हणून दचकून तो उभा राहिला. होय...तीच...तीच...त्याच्या दिशेनं येत होती !

लपून ती त्याला न्याहाळत राहिली असावी. तिला पहातांच तो मुलगा पळूं लागला. पळतां पळतां त्याचा एक पाय निसटून पाण्यांत पडला, पाणी उंच उडालं तरीहि तो तसाच पळत राहिला.

कांठावर आल्यावर त्यानं घाईघाईनं इकडेतिकडे पाहिलं. पण कांठाच्या या अंगाला लपण्यासारखं असं एकहि झुडूप नव्हतं. थोडेसे शेवाळाचे पट्टे होते. पण तिथं काय लपणार ? फुलांचा घमघमाट त्याच्या नाकाला झोंबत होता. क्षणभर त्याला अशी भावना झाली कीं आतां आपल्याला चक्कर येणार. पाठोपाठच कसलं तरी कढकढीत, खारं पाणीं जिभेवर पडल्यासारखं त्याला वाटलं. त्याच्या नाकांतून रक्त वहात होतं.

तो अजून पळतच होता. 'ए वेड्या मुला ! ए वेड्या मुला !' हे शब्द आपला पाठलाग करीत येत आहेत असं त्याला वाटत होतं.

\+ + +

शनिवार आला.

तो ओढयावर आला त्याच्या आधींच ती आली होती अन् पाण्याशी खेळत होती जसं कांहीं आपण तिला पाहिलेलंच नाहीं अशा आविर्भावांत तो ओढयावरचे दगड ओलांडूं लागला.

"तूं !" पण आपण कांहींच ऐकलं नाहीं असं त्यानं भासविलं अन् तिच्या अंगावरूनच तो पलीकडच्या कांठाला गेला.

"या माशाचं नांव कायरे ?"

मागं वळून तिच्याकडे पहायचं नाहीं असं त्यानं ठरविलं होतं. पण तिचा प्रश्न ऐकतांच तें तसंच राहिलं. तिच्या तपकिरी पाणीदार डोळ्यांना त्याचे डोळे भिडले. तिथून त्याची नजर घरंगळली ती तिच्या ओंजळींतील माशावर.

"त्याला म्हणतात रेशीममासा."

"कित्ती छान नांव आंहे, नाहीं ?—रेशीममासा !"

बोलतां बोलतां तीं दोघं दोन रस्ते मिळतात तिथं आलीं. तिला एका रस्त्यानं जायचं होतं. त्याला दुसऱ्या.

लांब एक डोंगर दिसत होता त्याच्याकडे बोट दाखवून तिनं विचारलं, "त्या डोंगरावर गेला आहेस का कधीं ?"

"नाहीं बुवा."

"आपण दोघंजण जाऊं या का एक दिवस ? आम्हीं या गांवांत आल्यापासून अगदी कंटाळा आलाय् बघ मला. कुणी खेळायला नाहीं कीं कांहीं नाहीं."

"तो डोंगर दिसायला दिसतोय् जवळ पण खूपच लांब आहे तो इथनं."

"खूप लांब असला तरी हरकत नाहीं. आम्हीं सेऊलला होतों तेव्हां याच्यापेक्षां लांब लांब अंतरावर आम्हीं ट्रिप्स काढीत असूं शाळेंतून."

हें ती बोलत होती, पण तिचे डोळे म्हणत होते, "तूं अगदींच वेडा आहेस !"

मग तीं दोघं भाताच्या शेतांतील अरुंद वाटांवरून चालूं लागलीं. कांहीं ठिकाणीं भाताची कापणी चालली होती. मध्येंच एक बुजगबाहुलं उभं होतं. भाताचीं पुष्कळशीं रोपं, बांधाबांधानं असलेल्या दोरीवर चढलीं होतीं त्या मुलानं त्यांतलीं एक दोरी बोटानं हलवली,





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

त्याबरोबर चिमण्यांचा एक कळपच्या कळप कुलकुलत बाहेर पडला नि भुर्रदिशी उडून गेला. (आतां आपण झपाझप पावलं टाकीत लवकर घरीं जायचं नि जवळच्या भाताच्या शेतांतील चिमण्यांना हुसकावून लावायचं.)

" कशी गम्मत आहे, नाहीं ?" मग तिनंहि ती दोरी हातानं धरली नि जोरजोरांत हलविली. दोरीच्या प्रत्येक हिसक्याबरोबर तें बुजकबाहुलंहि झोकांड्या खाऊं लागलं. दुसऱ्या शेतांत तिनं आणखी एक बुजगबाहुलं पाहिलं नि ती त्या दिशेनं धांवत गेली. तोहि तिच्या पाठोपाठ गेला. (घरीं लवकर जाऊन शेतांतल्या चिमण्या हुसकावयाच्या नि इकडचीं तिकडचीं कांहीं कामं करायचा आपला बेत त्यानें अर्धवट सोडून दिला होता.)

धांवत धांवत तो तिच्या पुढें गेला. त्याच्या प्रत्येक पावलाबरोबर गवतांतून कितीतरी टोळ उडत होते. ते त्याच्या चेहऱ्यावर बोचत होते. पळतां पळतां त्याला वाटलं, वरचं निळंभोर आकाश एकदम गरगर गरगर फिरायला लागलं आहे. पहातो तों, एक गरुड पक्षी अंतराळांत भिंगरीसारखा फिरत होता. ती मुलगी अजूनहि दोरीला हिसके देत होती अन् तें बुजगबाहुलं त्या हिसक्याबरोबर नाचत होतं, पहिल्या बुजगबाहुल्यापेक्षां हें अधिक चांगलं नाचत होतं.

भाताचीं शेतं संपलीं. मग एक लहानसा झरा लागला. झऱ्याला लागूनच सोयाबीनचीं शेतं होतीं. तीं थेट टेकड्यांच्या पायथ्यांपर्यंत पसरलीं होतीं—नव्हे, त्याहीपलीकडे तीं गेलीं होतीं.

उडी मारून तिनं झरा ओलांडला. पलीकडेच सोयाबीनच्या रोपट्यांचा एक तुकडा होता. त्यांत चार काठ्या उभारून एक माचण शाकारलं होतं.

त्या मांचणाकडे बोट दाखवून तिनं विचारलं. "हें काय आहे रे ?

"माचण"

"इथलीं टरबुजं गोड असतात का रे ?"

"हो...पण त्यांच्यापेक्षां कलिंगडं चांगली असतात."

"आत्तां...इथं...एखादं कलिंगड आपल्याला मिळालं तर किती बरं होईल नाहीं ?"

जवळच कांहीं मुळे लावलेले होते. त्यांतली दोन त्यानं उपटून काढले, वरचा पाला खुडून टाकला नि त्यांतला एक मुळा तिला दिला. तो कसा खायचा हें दाखविण्यासाठीं त्यानं आपल्याजवळचा मुळा थोडा दांतांनीं कुरतडला व अंगठ्याच्या नखानं त्यानं वरची पांढरी साल काढून टाकली.

त्याचं बघून तिनंहि तसंच केलं. मग थोडासा मुळा तिनं तोंडांत टाकला नि बाकीचा राहिलेला फेंकून दिला.

"हँ...मला नाहीं आवडला."

"मलाहि नाहीं. अजिबात गोड नाहीं." अन् तिनं टाकला होता त्याच्याहि पार पुढं त्यानं आपल्याहि हातांतील मुळा फेंकून दिला.

हळूं हळूं तो डोंगर जवळ येत चालला होता. मेपल वृक्षाचीं पानं


मरमेड पेन्टम् लि. चे सर्व प्रकारचे रंग

धी वॉटरप्रुफ पेपर मॅन्यु. कं. प्रा. लि. चे
वॉटरप्रुफ पॅकिंग व रॅपिंग पेपर,

हार्ड कॅसल बॉंड मॅन्यु. कं. प्रा. लि. चीं
औद्योगिक रसायनें व तत्सम इतर माल पुरवून

गेलीं ३७ वर्षें भारतीय औद्योगिक क्षेत्रांत आम्हीं जनतेची सेवा सतत करीत आहों.

औद्योगिक क्षेत्रांत लागणारा सर्व प्रकारचा माल आमचेकडे नेहमीं मिळतो.

चौकशींकरितां लिहा:—

हार्डकॅसल बॉंड आणि कंपनी प्रायव्हेट लि.,

ॲलिस बिल्डिंग, डॉ. दादाभाई नौरोजी रोड, फोर्ट मुंबई—१.

टेलिग्राम : बॉंडको  टेलिफोन नं. २५५७७१.

शाखा : कलकत्ता, मद्रास, अहमदाबाद.


अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सूर्यप्रकाशांत नुसतीं धगधगत होतीं. डोंगर जवळ आलेला पहातांच ती मुलगी आनंदाच्या भरांत ओरडली नि त्याच्या पायथ्याच्या दिशेनं तिनं जवळ जवळ मुसंडीच मारली. तो मुलगा मागें राहिला होता. चालतां चालतां तो फुलं वेंचीत होता.

" या फुलाला म्हणतात. खिसँथेतम्...याचं नांव आहे, बुश-क्लोव्हर अन् हें...वेलफ्लॉवर..."

" वा...वेलफ्लॉवर इतकं सुंदर असतं अशी मला कल्पनाहि नव्हती. अन् हें लव्हेंडरहि कित्ती छान आहे...अन् या छोट्या छत्री-सारख्या पिवळ्या फुलाला काय म्हणतांत रे ? "

" मातारी. "

डोक्यावर छत्री धरावी तसं तिनं तें फूल धरलं होतं.

मग त्यानं आणखी खूप खूप फुलं वेंचलीं अन् त्यांतलीं निवडून निवडून, अधिक ताजीं होतीं तीं तिला दिलीं.

" बाकीचीं फुलं टाकायचीं नाहींत, बरं का ? " तिनं त्याला ताकीद दिली.

डोंगरावरून खालीं पाहिलं कीं छपराचीं घरंच्या घरं एकमेकांना बिलगून उभीं असलेलीं दिसत होतीं. जवळच एक भली मोठी शिळा होती. त्या शिळेवर तीं दोघंजणं बसलीं. आसमंतांत स्तब्धता शिगो-शिगा भरून राहिली होती. पडलेलं ऊन पावसाळ्यांतलं असलं तरी कडाक्याचं होतं. सुक्या गवताचा वास त्या उन्हांत मिसळत होता.

" तीं वरच्या अंगाला फुलं दिसताहेत तीं कसलीं रे ? " वर एका चिंचोळ्या, लहानशा उंचवट्यावर जांभळ्या-गुलाबी फुलांचीं रोपटीं दिसत होतीं त्यांकडे बोट दाखवून तिनं विचारलं.

" अगदीं विस्तेरियाच्या फुलांसारखी दिसताहेत ती हुबेहूब, आमच्या सेउलच्या शाळेच्या पटांगणांत होती विस्तेरियाची फुलं. हीं फुलं पाहिलीं कीं मला माझ्या सेउलच्या शाळेंतील मैत्रिणींची आठवण होते. "

मग हळूं हळूं ती त्या उंचवट्यापाशीं गेली नि फुलं तोडूं लागली. पण तीं फुलं कांहीं देंठांशीं तुटेनात. त्या प्रयत्नांत तिचा पाय घसरला, पण एक रोपटं घट्ट धरून ठेवल्यामुळें ती कशीबशी सावरली.

तेवढ्यांत तो मुलगा धांवत धांवत तिथं आला नि त्यानं तिला हात देऊन वर उठविलं. खरं म्हणजे आपणच हिला फुलं तोडून द्यायला हवीं होतीं; पण तसं न केल्याबद्दल त्याला खूप वाईट वाटलं. त्यानं तसं तिला बोलूनहि दाखवलं.

तिचा उजवा गुडघा थोडा खरचटला होता अन् त्यांतून रक्त येत होतं. तसाच तो खाली वांकला नि तोंड लावून त्यानं तें रक्त भराभर शोषून घेतलं. मग त्याचं त्यालाच काय वाटलं कुणास ठाऊक ! तो उठला नि तिथून धूम पळत सुटला.

तो परत त्या ठिकाणीं आला तो धापा टाकीतच. " हं...हा लाव जिथं खरचटलं आहे तिथं. त्यानं थांबेल. " त्यानं कसलातरी पाला ओरबडून आणला होता. तो त्यानं तिच्या गुडघ्यावर चोळला.

तिथं पलीकडें एक वासरूं आहे. पहायचं आहे का ? "

तें वासरूं तपकिरी रंगाचं होतं अजून त्याच्या नाकांत दावं बांध-लेलं नव्हतं इतकं तें लहान होतं. जवळ जाऊन त्यानं त्या वासराची पाठ खाजवली अन् उडी टाकून पटकन् तो त्याच्या पाठीवर बसला. ज्या खांबाला त्याला बांधून ठेवलं होतं त्याच्याभोंवतीं तें वासरूं गरगर फिरूं लागलं. त्या मुलाचा गोरा मुखवटा, तिचा तो गुलाबी स्वेटर, गर्द निळा झगा नि हातांतली रंगीबेरंगी फुलं यांनीं रंगाचं एक झगमगतं वर्तुळच विणलं. वासराच्या पाठीवर बसल्याबसल्या त्याला भोंवळ आल्यासारखं वाटूं लागलं. तरीहि तो कसाबसा त्याच्या पाठीवर बसून राहिला. आपल्या या पराक्रमाचा त्याला विलक्षण अभिमान वाटत होता.

" ए पोरांनों, काय उपद्व्याप चाललेत रे तुमचे ! " गवताच्या पात्यांतून एका शेतकऱ्यानं डोकावून म्हटलं. तो मुलगा वासराच्या पाठीवरून घाईघाईनं खालीं उतरला. इतक्या कोंवळ्या वासराच्या पाठीवर बसल्याबद्दल त्या शेतकऱ्यानं आपली चांगलीच कानउघाडणी केली असती असं त्याला वाटलं.

पण त्या शेतकऱ्यानं तसं कांहींच केलं नाहीं. उलट तो लांब दाढीवाला मनुष्य त्यांना एवढंच म्हणाला, " पळा, पाऊस यायच्या आंत आधीं घरीं पळा. "

काळ्याकुट्ट ढगांचा एक प्रचंड स्तंभ आभाळांत आला होता. सगळं चराचर शहारल्यासारखं झालं होतं. वाऱ्याचा एक झोतच्या झोत आला अन् त्यानं सगळी झुडपं गदगदां हलविली. झाडांचीं पानें सळसळ सळसळलीं. अन् मग दाही दिशा जांभूळल्यासारख्या झाल्या.

तीं दोघं डोंगरमाथ्यावर होतीं तेव्हांच पावसाचे पहिले थेंब आले नि ओक वृक्षाच्या पसरट पानांवर टपटपले. डोंगर उतरत असतांना एखाददुसरा थंडगार टपोरा थेंब त्याच्या मानेवर पडत होताच अन् मग एकाएकी त्याची जी मुसळधार सुरूं झाली तिच्यामुळेंच पुढचं कांहींच दिसेनासं झालं. त्या धो धो पावसांतून तीं दोघं कशीबशी एका माचणापाशीं आलीं. त्या माचणाच्या आंतहि बाहेरच्यासारखंच पाणी गळत होतं. पण त्यांतल्या त्यांतहि सुकी असलेली जागा त्यानं शोधून काढली नि तिला तिथं उभं केलं. तिचे ओंठ जांभळे पडले होते. खांदे थरथरत होते. त्यानं आपल्या अंगावरचं जाकीट काढलं नि तें तिच्या शरीराभोंवतीं लपेटलं. तिनं एकदांच त्याच्याकडे पहाण्यासाठीं म्हणून वर नजर केली. पावसाचे चारदोन थेंब तिच्या डोळ्यांवर आले. मग ती निवांतपणें आपल्या हातांतील कोमेजलेलीं नि चुरगाळलेलीं फुलें बाजूला काढीत उभी राहिली.

छपरांतून तिच्या अंगावर पाणी येऊं लागलं. आतां त्या माचणाचा आश्रय घेऊन उभं रहाण्यांत कांहींच अर्थ नव्हता. जवळच गवताची एक भली मोठी गंजी होती. त्या गंजींत एखाद्या माणसापुरती जागा होणं सहज शक्य होतं. तो मुलगा त्या गंजीकडे गेला नि आंत हात घालून त्यानं पावसाचं पाणी कितपत आंत येतं याचा अंदाज घेतला. सुदैवानं तिथं पाणी पडत नव्हतं. अधिक काळजी म्हणून त्यानं बाहेरच्या अंगानंहि चारदोन पेंढ्या लावल्या नि तिला खूण केली.

आंतमध्यें खूप अंधार होता अन् दोघांना उभं राहण्याइतकी जागा तिथं नक्कीच नव्हती. तो बाहेर पावसांतच उभा होता, नि त्याच्या उघड्या पाठींतून वाफारे बाहेर पडत होते.

( पान ५७ वर पहा )






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तरें तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. परंडाचे गुन्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच ! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचे पारितोषिक देणार आहोंत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल कु. शरयू गोळे, मालाड यांना पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीने पैसे पाठविले जातील.

---

**कु. शरयू गोळे,** मालाड

**प्रश्न—जगांत संपूर्ण समता केव्हां उत्पन्न होईल ? सारे भेद केव्हां नष्ट होतील ?**

**उत्तर**—तारेचा खांब व सारंगी एकाच पातळीवर येतील तेव्हां. कस्तुरी व डांबरगोळ्या ह्यांना सारखाच गंध येईल तेव्हां. म्हैस व मोटर ह्यामधील भेद नाहींसा होईल तेव्हां. गाढवें व कोकिळा एकाच स्वरांत ओरडूं लागतील तेव्हां. स्त्री आणि पुरुष ह्यांची वेगळी ओळख काढतां येणार नाहीं तेव्हां.—तेव्हां जगांतील सारे भेद नष्ट होतील.

**प्रश्न—स्त्रीला पुरुषानें शतकानुशतकें दास्यांत ठेवण्याचें कारण काय ?**

**उत्तर**—शतकानुशतकें दास्यांत राहणारी जात, दास्यांत राहण्याच्याच योग्यतेची असली पाहिजे, येवढयाच सबळ कारणासाठीं.

**प्रश्न—बायकांनीं पुरुषासारखे कपडे केले तर त्यांत कांहीं बिघडलें काय ?**

**उत्तर**—पुरुषांनी बायकांसारखे कपडे केले तर त्यांत कांहीं बिघडल्यासारखें तुम्हांला वाटेल काय ? अशा साडीचोळी ल्यालेल्या पुरुषाबरोबर तुम्हीं सिनेमाला जाल काय ? किंवा त्याच्याशीं लग्न कराल काय ?

**आर. एन. पाटील,** कोल्हापूर

**प्रश्न—प्रश्नोत्तरांचे हे पाणपोई नांवाचे सवंग सदर ‘दीपावली’नें कां ठेवलें आहे ?**

**उत्तर**—‘दीपावलीला’ सवंग वाचकांचीहि कांहीं थोडी सोय पाहिली पाहिजे म्हणून.

**प्र. तु. चव्हाण,** कोल्हापूर.

**प्रश्न—तमाशा सात्विक व सोवळा केल्यास काय होईल ?**



**उत्तर**—तारुण्यानें मुसमुसलेल्या अठरा वर्षांच्या मुलीला “सोवळी” केल्यास काय होईल ? जेव्हां बेधडकपणें शृंगार करावयाचा तेव्हां संध्येचा सोवळा पवित्रा घेतल्यानें काय होईल ?

**प्रश्न—तमाशा सोवळा केल्यास तो आबालवृद्धांना पाहतां येईल नव्हे कां ?**

**उत्तर**—चिंचा गोड झाल्यास त्या आबालवृद्धांना खातां येतील. पण मग चिंचेचा चिंचपणाच नाहींसा होईल. खिम्याचा साबूदाणा झाल्यास तो आबाल वृद्धांना व बायकानांहि उपासातापासाला खातां येईल. पण त्यामुळें खिमा खाण्यांतील उर्मट आनंद नष्ट होईल. खिमा हा खिमा राहणारच नाहीं. तमाशा सोंवळा झाल्यास तो तमाशाच राहणार नाहीं. त्याचा “योगवासिष्ठ” होईल. परंतु जीवन परीपूर्ण होण्यासाठीं जशी “योगवासिष्ठाची” आवश्यकता आहे. तशीच जातिवंत तमाशाचीहि आहे.

**म. ना. जोशी**—जळगांव.

**प्रश्न—जगांतील युद्धें केव्हां नाहींशी होतील ?**

**उत्तर**—युद्धामुळें जगांतील माणसे नाहींशी होतील तेव्हां.

**प्रश्न—राष्ट्राराष्ट्रांत भांडणें कां होतात ?**

**उत्तर**—माणसामाणसांत भांडणें कां होतात ? जातीजातींत भांडणें कां होतात ? पक्षापक्षांत भांडणें कां होतात ? भावाभावांत भांडणें कां होतात ? व नवराबायकोंत तरी भांडणें कां होतात ?

**प्रतापराव शितोळे,** बेळगांव.

**प्रश्न—महाराष्ट्राच्या सीमा प्रदेशाचा प्रश्न पूज्य विनोबाजी कां सोडवीत नाहींत ?**

**उत्तर**—तो प्रश्न सोडविला गेला आहे. महाराष्ट्राच्या सीमा प्रदेशाचें शेजारी प्रांतांना “भूदान” केले गेलें आहे.

**कु. कुंदबाला र. जोशी,** धुळें.

**प्रश्न—नवकाव्याचे भवितव्य आपल्या शब्दांत रेखाटावयास आपल्याला आवडेल कां ?—तर ते प्रामाणिकपणे रेखाटा.**

**उत्तर**—

नवकाव्य चालले आहे
ओठाकडून दांताकडे,
माळेकडून लाळेकडे
चोरीकडून मोरीकडे—
घामाकडे, घाणीकडे
नवकाव्य चालले आहे
गंगेकडून गटाराकडे
नवकाव्य गेले आहे
कलेकडून अकलेकडे
अर्थाकडून अनर्थाकडे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

शब्दाकडून अपशब्दाकडे
उर्वशीकडून म्हशीकडे
नवकाव्य गेले आहे
मरणाकडून सरणाकडे.

**माधव दिनकर लेले,** दादर, मुंबई.

**प्रश्न—आपणाला एखादेवेळीं मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद दिल्यास तुम्ही संयुक्त महाराष्ट्राचा ठराव आणाल कां ?**

**उत्तर**—मी ठराव आणेपर्यंत संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न लोंबकळत रहावा असे तुम्हास वाटते काय ?

**सौ. मुक्ता व विजय जठार,** पुणें ४

**प्रश्न—गरीबांना नाडणारी लांचलुचपत वरपासून खालपर्यंत सर्रास चालू आहे हे माहित असूनहि आपले सरकार त्याविरूद्ध कांहींच उपाय कां योजीत नाहीं !**

**उत्तर**—लांचलुचपत बंद पाडण्यासाठीं निर्माण केलेली यंत्रणा लांचलुचपत बंद पाडण्याच्या निमित्तानें लांचलुचपत घेत असेल तर पुढें काय करायचे ?

**विजय जठार,** पुणें ४

**प्रश्न—वायकांचे खरे वय कसे ओळखावे ?**

**उत्तर**—त्यांच्या नवऱ्यांच्या चेहेऱ्यावरून.

• • •

---

[ पान ३३ वरून चालू ]

लपलेल्या अंगाप्रत्यंगाची स्पष्ट कल्पना यावी असे तंग कपडे, कोचावरून ओणवायला लावून किंवा नृत्यांत भुईसपाट खेळायला लावून देखण्या नर्तिकेला, प्रेक्षक झरझरावा अशा हेतूनेंच कॅमेऱ्यापुढें आणणें अशा एक ना अनेक गोष्टी चित्रपटांतून नाहींत काय ? चित्रपटांत प्रकाशाच्या दिव्यांनासुद्धां उत्तान शृंगाराचे साथीदार बनवले जातें. तरी सिनेमा चालतो. तमाशाच तेवढा बदनाम. चित्रपटांतली कांहीं गाणी तशीच जर तमाशाच्या संनीत बारींत म्हटली तर बधे "अर्रर, हिच्या कोणत्या चिंचा पाडाला आल्या ?" म्हणून शिट्ट्या घालतात. रसाळ आंबेवालीचें गाणें तमाशांत नाची म्हणते तेव्हां "हां दिसले. आंबे दोन आहेत." असा कुठून तरी आवाज येतो. प्रतिष्ठितांच्या घरीं त्या ध्वनिमुद्रिका पोराबाळांनीं मिटक्या मारीत ऐकल्या पण त्याच तमाशांत अश्लील झाल्या. कुणी ग बाई केला, कसा ग बाई झाला–राधे तुझा सैल आंबाडा—" हें 'भाव' गीत बुद्रुकांनीं माना डोलावीत ऐकले असेल, तमाशांत तेंच आले कीं 'त्या' नंतर ती केस ठाकठीक करूनसुद्धां आली नाहीं असा अर्थ प्रेक्षकांनीं घेऊन हो हो करून शिट्ट्या घलायच्या. कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकांत अग्निमित्र राजा मालविकेच्या कमरपट्ट्याला हात घालतो असें वर्णन आहे ते सारे चालते पण तमाशांत तसेंच म्हटले की ओंगळ, अश्लील !

या सर्वांवरून एक दिसेल कीं ज्या गोष्टींना किंवा ज्या प्रकारांना हल्लीचा प्रतिष्ठितांचा समाज अश्लील म्हणतो तसें प्रकार इतरत्र कुठें घडत नाहींत आणि तमाशांतच ते घडतात असें नाहीं. पण बदनाम झालेल्या माणसाची जशी प्रत्येक कृति संशयास्पद ठरते तसा बऱ्याचदां तितके न करताही तमाशा बदनाम ठरला आहे. खरें म्हटलें तर वगांत अश्लीलतेपेक्षां नाट्य, नृत्य, गीतें आणि उपदेशपरताच अधिक असते. पण तमाशा म्हणतांच जिथें "शी:" केले जाते तिथें त्यांत चांगले सुद्धां असते तें पहातोच कोण ? अशा रीतीनें तमाशा या नांवाभोवतीच निर्माण झालेले एक अश्लीलतेचे किंवा हीनतेचे वलयसुद्धां तमाशांत अश्लीलताच तेवढी दिसायला कारणीभूत झाले आहे. तमाशा न पहाताच त्याला वाईट म्हणणारा जो वर्ग आहे तो याच समजुतीनें पछाडलेला असतो.

तमाशातील करमणूक चावटपणाचीच असते अशा समजुतीमुळेंच यापुढचें पांचवें कारण निर्माण झालें आहे. तें कारण असे कीं हा कार्यक्रम केवळ पुरुषानींच पहायचा कार्यक्रम ठरला. त्यातही चावटपणाचीच समजूत त्याच्याभोवती निश्चित होऊन गेल्यामुळें समाजांतील उडाणटप्पू पुरुषांचीच ही करमणूक बनली. उडाणटप्पूचे टोळके तमाशा बघायला बसल्यावर त्याला केवळ चावटपणांतच गंमत वाटते. आपणाला ज्यांत अधिक गंमत वाटेल तेंच तमासगिरानें अधिक द्यावें अशी अपेक्षा ते करतात. तमासगीर हे गरीब हलक्या जातीचे, आज्ञा झेलणाऱ्या वर्गातले त्यामुळें "जी हुजूर" म्हणून आपल्या रसिक धन्याला खूष करून त्यांतच त्यानें फुशारकी मारली तर त्यांत नवल कोणते ?

मोठमोठ्या विद्वान साहित्यिकांच्यासुद्धां केवळ पुरुषांच्या खाजगी बैठकी कुणीतरी पाहून घ्याव्यांत. तिथें एकमेकांच्या चावट चेष्टा-मस्करीला ताळ रहात नाहीं. आणि तमाशा ही तर केवळ पुरुषांतील रंगेल उडाणटप्पूंच्या घोळक्याची कला बनली. जसे रसिक तसें कलेला बनावेंच लागते. त्यामुळें तमाशाचा संयम अधिकच सुटला. किंबहुना तो ज्यांत संयम पाळला जातो, तमाशाच कसला असें म्हणणाराही एक रंगेल रसिक वर्ग आहे; अशा रंगेल रसुलांनीं निर्माण केलेले दोषही तमाशा आणि तमासगीर यांच्या माथ्यावर खापरासारखे फुटले !

तमाशा अश्लील व्हायला अजूनही एक सहावें कारण घडलेलें दिसून येतें. ते म्हणजे खुद्द तमासगिरांची स्थिति आणि त्यांच्या जीवनाचे झालेले स्वरूप. तमासगीर हे बहुतेक सर्व समाज रचनेंतील हलक्या, हीन मानलेल्या आणि अस्पृश्य जातींतील लोक. त्यांना शिक्षण तर नाहींच. इतकेंच काय त्याचें जीवनमान अत्यंत दारिद्र्याचे आहे. दारिद्र्यांतून काय उत्पन्न होत नाहीं ? गलिच्छ ओंगळ रहाणी, ओंगळ विचारसरणी, हिणकस राकट भाषा, उग्र भावनादर्शन, पशु बनवणारीं व्यसनें हीं सर्व अज्ञान आणि दरिद्रता या जोडप्याची पिल्लें आहेत. तमासगिरांच्या अंगावर ही पिल्लें वर्षोवर्षें खुशाल खेळत आली. त्यामुळें त्यांच्या सबंध जीवनालाच फाटका, गंजून गेलेल्या पत्र्यासारखा रंग आला. नाहींतरी बहुतेक तमासगीर अशा गंजलेल्या तुटक्या पत्र्याच्या खुराड्यांत आणि नाचणाऱ्या स्त्रिया फिरत्या कुडाच्या पालांतच रहात आल्या आहेत. रोज रोज समोर तशाच गोष्टी पाहून त्यांची संस्कृतीच कळकट विटकी बनली. आणि त्यांतून आलेल्या ह्या कलाकार आणि कलावतींनी समाजाला पावित्र्य आणि उदात्तता कुठून आणून द्यावी ? क्षणभर कुणी हात दावेना का—तो एक चवली पावली तरी देईल कीं जी संध्याकाळीं चिपटेभर तांदूळ आणायला उपयोगी पडेल अशी ज्या कलावतींची स्थिति, त्या लोकांना शुद्ध रहाण्याचा उपदेश करून आपण लवकर स्मशानांत जाण्याची तयारी करतील काय ? ही त्यांच्या जन्माची झालेली परवड इतकीं पराकोटीला गेली आहे कीं कुणी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

एकाद्या धुवट कपड्यांतील अनोळखी प्राण्यानें केवळ संशोधनासाठींच त्यांच्या गलिच्छ वस्तींत जाण्याचे धाडस केले तर स्वतः तमासगीर म्हणतात, "छे छे, साहेब ही नर्कपुरी आहे तुमी हितं कशाला आला?" अशा या नर्कपुरीचा दोष समाजरचनेंत आहे की तमासगिरांचा आहे? आजकाल जरी कांहीं तमासगीर स्त्रिया इस्टेटी करून राहिलेल्या दिसत असल्या तरी त्यांच्या धंद्याची सुरवात अशी या तऱ्हेनेंच झालेली आहे.

तमासगिरांच्या या जीवनमानाचाही परिणाम तमाशावर होऊन ते दाखवतात तो शृंगार बीभत्स, अशिष्ठ आणि बऱ्याचवेळां अश्लील बनत जातो. आपण जे करून दाखवतो ते शिष्ठ समाजाला इतके भयानक वाटेल अशी त्यांना बऱ्याच वेळां कल्पनाही नसते. पुष्कळ वेळां सर्वत्र विटून बुरसटलेल्या आपल्या शिदोरींतून एकादा त्यातल्यात्यांत चांगला तुकडा काढून तो रसिकांना वाढतो परंतु नेहमींच पानाभोवती रांगोळी काढून सदैव गरम गरम तूपभात खायची संधी ज्यांना लाभली त्यांना त्याही तुकड्याला विटकेपणाचा वास येतोच. आणि अशा रीतीनें तमाशांत एकाद्या उच्च वर्णीय शिष्टाला बहुतेक सारे अश्लील वाटले तर तो दोष तमासगिरांचाच काय?

दोष कुणाचाही असो, मात्र मुख्यतः या सहा कारणांनीं तमाशांतील शृंगाराला बीभत्सपणाचा रंग आला आहे. हे नाकारून चालायचें नाहीं. या कारणाचा विचार करतांना केलेली चर्चा ही त्यांतल्या अश्लीलतेची किंवा अशिष्ठतेची तरफदारी नव्हे. ती कशी आली तिचा सारा दोष तमाशा आणि तमासगिरावर टाकतां येत नाहीं हें सांगण्याचा हेतु आहे. या सहाही कारणांकडे पाहिल्यावर बराच दोष परिस्तितीचा दिसेल. तमाशा शृंगारासाठीं जन्मला असला तरीही त्यांत कांहीं चूक नाहीं, खेडवळ गावकऱ्यांच्या जीवनांत शृंगार नको काय? पण एकंदर स्थितीचा बनावच असा कांहीं झालेला आहे कीं जी अश्लीलता आली तिचा दोष अनेकांचा असून तो केवळ तमाशा आणि तमासेवाले यांच्यावरच मारला गेला. त्याचमुळें शुद्ध मराठी बाण्याची ही कला समाजांतील लब्ध प्रतिष्ठितांनीं हिणकस, ओंगळ, अश्लील म्हणून बदनाम केली!

या अस्सल मराठी घाटाच्या कलेला अश्लीलतेचा कलंक तर लागून गेला आहे, पण त्यासाठीं सर्व तमाशा हाच तिरस्कारणीय आणि टाकाबू म्हणून मरूं द्यायचा काय? तमाशांतील अश्लीलतेचा कलंक हा मराठीच्या अंगरख्यावर पडलेल्या डागासारखा आहे; कपड्याला पडलेला डाग धुवायचा असतो. त्यासाठीं सारा कपडाच फेकून देणें हें शहाणपणाचे ठरायचे नाहीं असें म्हटलें ते याचसाठीं.

तमाशांतील ही अश्लीलता काढायचीच झाली तर कुणीं आणि कसकसे प्रयत्न केले पाहिजेत याचा बारकाईनें विचार करायला गेल्यास दिसून येईल कीं तिच्यावर तीन बाजूंनीं प्रयत्न केले गेले पाहिजेत. या तीन बाजू कोणत्या?

(१) तमासगीर.
(२) रसिकवर्ग.
(३) सरकार.

स्वतः तमासगीर हल्लीं अशा अवस्थेला गेले आहेत कीं आतां त्यांच्या मदतीला धावल्याशिवाय ते जगूं शकणार नाहींत. तमाशाला ही पुन्हां आलेली बाल्यावस्थाच म्हटली पाहिजे. असा हा तमाशा कुणासाठीं आहे? प्रत्येक कला जशी रसिक वर्गासाठीं, तसा तमाशाही त्याच्यासाठींच आहे. तेव्हां त्याचा मालक सामान्य रसिकवर्गच समजावा लागेल, आणि ज्यावेळीं देशांत स्वतःचे सरकार असते त्यावेळीं त्या सरकारनें देशांतील कला, साहित्य आणि संस्कृति यांचें पालन करणें ही जबाबदारी त्याच्यावर पडतेच. म्हणजे तमासगीर हें बालक, रसिक हे मालक आणि सरकार हे त्याचे पालक बनले आहे. तमाशाचा हा अंगरखा धुवून स्वच्छ करायचा असेल तर या बालक, मालक, पालक–तिघांनीं एकत्र येऊन तो धुतला पाहिजे!

या तिघांनीही काय काय केले पाहिजे याचा विचार करताना आपण प्रथम सरकारपासून सुरवात करून उलट्या क्रमानें एकेकांची जबाबदारी पहात जाऊं या.

सरकार कर्तव्यदक्ष होऊन तमाशाकडे लक्ष देऊं लागले आहे ही चांगली गोष्ट घडली आहे. तमाशांतील ही अश्लीलता जावी म्हणून ते झटून प्रयत्न करीत आहे. प्रत्यक्ष सरकारनें तमाशाचे लिखाण तपासण्याचा उपक्रम सुरु केला आहे. परंतु केवळ लिखाण तपासून रंगभूमीवर सादर करण्याच्या कला प्रकारांतील एकादी गोष्ट कमी होते काय हा एक प्रश्नच आहे. त्याचे उत्तर शोधत गेल्यास तसे होत नाहीं हें स्पष्ट दिसेल. कारण रंगभूमीवर किंवा फडांत बसे मंडळी ते लिखाण पहात नाहींत, ते लिखाण बोलणाऱ्या नटांना पहातात. नट केवळ लिखाणच बोलायला रंगभूमीवर येत नाहींत ते दिग्दर्शकानें दिलेलें


आ कर्षक
शा नदार
छपाईसाठीं सुप्रसिद्ध
आशा प्रिन्टरी
१३ वी खेतवाडी, मुंबई ४.
बहुरंगी छपाई हें आमचें प्रमुख वैशिष्ट्य.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अविर्भावही करतात–दिग्दर्शक नसेल तर ते स्वतःनेंच केलेले असतात. म्हणजे फडात उतरलेला कार्यक्रम तीन शक्तींनीं बनलेला असतो. (१) लेखक (२) दिग्दर्शक (३) नट. यांतल्या नुसत्या लेखकाला सरकार हल्लीं तपासते आहे. परंतु केवळ लेखक हा बीजा-स्वरूप आहे. झाड वाकडे वाढूं नये म्हणून दियांपेक्षां ते वाढत असतानाच त्याची अधिक काळजी घेण्याची गरज नाहीं काय ?

समजा एक असा लावणीचा संवाद आहे.

तो—चल ग पोरी नदीकडे–

ती—कशाला बाई, सांग ना गडे–

यांत ती पोरगी अश्लील नाहीं, नदी अश्लील नाहीं आणि नदीकडे जाणेंही अश्लील नाहीं. परंतु रंगभूमीवर तो येतांच एकदां हळूच डोळा मारून मानेला 'तिकडचा' हेलकावा देत तो ती ओळ बोलला. नंतर तिनेही जीभ काढून डोळे विस्फारून दुसरी ओळ म्हटली—की सुरू झाली अश्लीलता. आणि या दोन्ही ओळी झाल्यावरही त्यानें त्या 'कशाला' चे उत्तर कांहीं भलताच अविर्भाव करीत मूकपणेंच दिले कीं अश्लीलता शिगेला पोहोचली !

तेव्हां नुसते लिखाण तपासून फारतर ⅓ काम होईल. फडांत जाणारा कार्यक्रम तालमींत आणि पुन्हां प्रत्यक्षही सुरवातीला पाहून तो अश्लील नाहीं याची खात्री करून घेतली पाहिजे तरच तो अश्लीलतेंतून बचावून निघेल. यासाठीं तमासगिरांना आपल्या कार्यक्रमाच्या तालमी करण्याची जरूरी भासवली पाहिजे. तमासगीर रहातातच अशा ठिकाणीं कीं त्यांच्या झोपड्यांत पाय ठेवायला जागा नसायची; तिथें ते तालमी कुठें करणार ? ही तालमीच्या जागेची सोय तूर्त तरी पालका-शिवाय कोण करणार ? आपलें हे बालक अधिकाधिक तयार व्हावें म्हणून सरकारनें त्यांच्या कलाविषयक शिक्षणाची सोय करावी. 'मोठ्या' लोकांचें बोलणें वागणें त्यांच्या नजरेसमोर यावें म्हणून त्यांनाही या मोठ्या लोकांत आणून मानानें बसवण्याची परिस्थिति निर्माण करावी. जीवनमान हें मुख्यतः ज्या मिळकतीवर अवलंबून असते, तिच्याबद्दल पुढें विचार करायचाच असल्यानें जेणें करून तमासगिरांना उत्तम संस्कृतीचे दर्शन होईल, त्याना ती ब्याबीशी वाटेल अशी नेहमीं संधि निर्माण करावी एवढेंच इथें सांगणें पुरें !

सरकारकडून अजूनही एका गोष्टीची अपेक्षा आहे. तमाची मूळ कला हळूंहळूं मृतप्राय होत चालली आहे. त्या लावण्यांच्या फडकत्या चाली जाऊन चटोर सिनेमागीतांनीं फड भरले आहेत. अशा जुन्या चालींच्या लावण्याचे ध्वनिमुद्रण करून त्याची स्वतंत्र लायब्ररी करावी. तमाशा पद्धतीच्या नाचाचे चित्रीकरण करून ते लोकांच्या आणि नव्यानें वाचणाऱ्या मुलींच्या पुढें ठेवावें; त्याची गोडी निर्माण करावी. ही लोककला जगवण्या-साठीं जुन्या लावणीचे वाङ्मय एकत्रित करावें. वाचनीय, श्राव्य आणि दृश्य अशी ही लोककलेची लायब्ररी करावी. ती नव्या नव्या तमासगिरांना नेहमीं दाखवण्याचा सोय करून त्यांना आपल्या कलेचे शिक्षण घेण्याची संधी ठेवावी. लोकांच्या सात्विक रसिकतेलाही यामुळें एक वळणच लागेल.

रसिकवर्ग हा आपण तमाशाचा मालक मानला; परंतु खुद्द मालकाला कुणी काय सांगावें ? तसें लोकमत हे अत्यंत लहरी आणि सदैव स्वेच्छेनें चालणारे असतें. तरीही एवढे म्हणतां येईल कीं केवळ बीभत्स भावनांची भूक भागवणारा कलाप्रकार म्हणून तमाशाकडे समाजानें पाहूं नये. ती आपल्या मराठी भाषेची एक स्वतंत्र कला आहे या अभिमानानें तमाशाकडे पहाण्याची वृत्ति ठेवली पाहिजे. तमाशांतच तेवढे सारें अश्लील असतें ही कल्पना टाकून देऊन इतर कलाप्रकारांत शृंगाराची जी मर्यादा समाज चालवून घेतो तेवढी तमाशाला न्यायानें दिली पाहिजे. तमाशा हा लोककलेचा प्रकार आहे, सामान्य लोकांची जशी भाषा असेल तशा भाषेंत बोलतांना उत्पन्न होणारे उग्रत्व तमाशाचे नव्हे, भाषेचे आहे हें जाणून घेऊन तमाशालाही मान दिला पाहिजे. रसिकवर्गांत कित्येक हरीचे लाल नाचीचा हात दाबण्यासाठीं चवली पावली काढतात. कुणाला तिच्या कलेवर खूष होऊन तिला चवली पावली द्यायचीच असेल तर तिची अब्रू आणि आपलीही इज्जत शाबूत ठेवून शक्तिनुसार तिला ते मानधन किंवा दौलत-ज्यादा द्यायला काय हरकत आहे ? जिनें तुम्हांला इतका आनंद द्यावा तिच्याच अब्रूचे धिंडवडे भरसभेंत तुम्हीं काढावेत या वृत्तीला काय नांव द्यायचे हे समाजांतील चवलींत हात दाबणारांनींच ठरवावें. असा हात दाबून दिलेली दौलतज्यादा समाजाच्याच मनांत अश्लीलता आहे हे तर उघड करतेच शिवाय "त्यासाठीं तूं अश्लील हो" अशी नाचीलाही एक प्रकारची आज्ञाच करते !

आणि आतां खुद्द तमासगीर ! तमास-गिरांनीं आपणावरील अश्लीलतेचा, हिणकस चावटपणाचा शिक्का काढून टाकायचा असेल तर त्यांनीं बतावणीची आणि हावभावाची फडांत उतरण्यापूर्वी तालीम केली पाहिजे. घाणेरडा चावटपणा कोणता हें त्यांनाही बरेंच कळते. तो होईल तेवढा तालमींतच कमी केला पाहिजे. यापुढें तमासगिरानें अज्ञानांत राहूं नये; वाणी रहाणी यांत होईल तेवढी अधिक अधिक स्वच्छता, सभ्यता आणली पाहिजे. तमासगिरांची मुलेंबाळेंही शिकलीं पाहिजेत. गेला काळ गंगेला मिळाला आतांची तमासगिरांचीं मुलेंही उद्यांचे उत्तम सुशिक्षित तमासगीर झालीं पाहिजेत. बग बसवतांना किंवा बारी लावतांना स्त्रियांनींही ती पाहिली तर तिला शिसारी येऊं नये असें कांहीं बग पहिल्या प्रतीच्या तमासगिरांनीं मुद्दाम बसवावेंत. 'स्त्रियांनींही पहाण्यासारखा तमाशा' अशी त्याची जाहिरात करून आपलें सदैव अर्धें तुटलेलें गिऱ्हाईक त्यांनीं आकर्षित करावें. केवळ बीभत्सतेची खाज भागवण्याचेच काम जन्मभर किती करायचे ? समाजाच्या मनांत आपणाबद्दलही कांहीं आदर निर्माण होईल असें मोलाचे जिणें जगण्याची त्यांनीं आकांक्षा धरावी. मराठी भाषेनें स्वतःची कन्या लावणी, तिच्या चालींचे बहुमोल अलंकार घालून तमासगिरांनाच देऊन टाकली आहे. तिला इज्जतीनें जगवण्याचे, तगवण्याचे आणि वाढवण्याचे पवित्र कर्तव्य आपण करीत आहोत अशी तमासगिरांनाही जाणीव झाली तर अश्लीलतेची घाण ते स्वतः होऊनच टाकतील ! चांगले कुणाला नको असते ? तमासगीर आणि संस्कृतीच याला कांहीं अपवाद नाहीं.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

मुंबईसारख्या गजबजलेल्या शहरांत घरफोडीचे प्रकार वारंवार घडतात. प्रिन्स राणा नांवाच्या एका सराईत आणि अट्टल घरफोड्यानें १९५८ सालीं एक धाडसी घरफोडी केली. पण मुंबईच्या पोलिसांची शिताफी कांहीं औरच. त्यांनीं ही घरफोडी करणाऱ्या चोराला हां हां म्हणतां पकडले. इन्स्पेक्टर पी. एल. मोकाशी यानीं चतुराईचें काम केलें आणि त्यानींच स्वतः ही विलक्षण हकीकत सादर केली आहे—



# 'प्रिन्स' राण्याचे प्रताप!

१८ जानेवारी १९५८ची रात्र.

बरोडा लॉजमधील एका आलीशान पण बंदिस्त अशा खोलींत एक जोडपं गाढ निद्रेंत होतं. घरांत पांचसहा नोकर आणि शिवाय फाटकाजवळ गुरखा. तसंच शेजारच्या बरोडा पॅलेसचे गस्तवाले सशस्त्र पोलीस अष्टौप्रहर जागे असल्यामुळें कुणी चोर दरोडेखोर येईल याचं अजिबात भय नव्हतं.

पण एवढी सुरक्षित जागा आणि कडेकोट बंदोबस्त असूनहि एका धाडसी घरफोड्यानें आंत कसा काय प्रवेश मिळविला कुणास ठाऊक ! त्यानें जडजवाहिर आणि रोख रकम असलेल्या कपाटांतील सर्व मौल्यवान वस्तु पळवल्या. हिऱ्या-मोत्यांची कुडीं, घड्याळें, रत्नहार, फौण्टन पेनें—मिळून एकूण ११९५० रु. ची चीजवस्तु कपाटांतून नाहींशीं झाली. जातांना त्यानें सर्व कुलुपें वगैरे नीट लावून आणि कोणत्याहि ठिकाणीं हाताचा ठसा उमटणार नाहीं अशी खबरदारी घेऊन त्यानें पळ काढला.

या जडजवाहिराचे मालक म्हणजे बर्माशेलचे जनरल मॅनेजर श्री. एल्. डी. मुडी.

पोलिसांनीं गुरख्याला विचारलं, तर त्यानें आपण रात्रभर जागे होतो आणि आपल्या दृष्टीस कोणीहि माणूस पडला नाहीं असें सांगितलें. घराचे दरवाचे बंद करणारे नोकरहि खात्रीचे आणि विश्वासाचे, त्यामुळें त्यांचा संशय घ्यायला जागा नव्हती. तरीपण संशयावरून सीताराम यशवंत या २६ वर्षें वयाच्या तरुणाला आणि दोन नोकरांना अटक केली. या सीताराम यशवंतची एक प्रेयसी दिल्लीच्या अशोक हॉटेलमध्यें आयाचें काम करीत असे. ती सीतारामचं कुशल विचारण्यासाठीं दिल्लीहून तारा पाठवीत असे आणि सीताराम तिच्यावर ज्या तऱ्हेनें पैसा खर्च करीत असे त्यामुळें त्याच्याबाबत संशय घ्यायला जागा होतीच.

गुन्हा घडला त्या ठिकाणची पोलिसानीं बारकाईनें पाहाणी केली. यां पहाणींत असे आढळलें कीं बरोडा लॉजच्या शानदार बागेंत रात्रीं कुणीतरी येऊन गेलं असावं. कारण कुणीतरी ताजं शहाळं फोडून खाल्लेलं दिसत होतं. त्या व्यक्तीनें चारमिनार सिगारेटस् ओढल्या होत्या, कारण बाजूला चारमिनारची थोटकं पडलेलीं होतीं. याशिवाय बागेंत एक पायमोजा पडलेला होता. हा पायमोजा आपलाच आहे असें सौ. मुडींनीं लागलीच ओळखलें. पण बागेंत पडलेल्या वस्तुमुळें पोलिस अधिकच गोंधळांत पडले. पण हा चोर

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

घरांतला नसून बाहेरचा असावा अशी त्यांची खात्री झाली.

आमचे सुपरिंटेंडेंट श्री. सी. ए. पिंटो हे कांहीं काळ गांवदेवी पोलिस स्टेशनवर होते. त्यांनीं असा तर्क केला कीं हें काम ख्यातनाम घरफोड्या प्रिन्स राणा ऊर्फ हबीबुल्ला ऊर्फ हैरेकृष्ण राणा याचेच असावें.

या इसमाला निरनिराळ्या आरोपांखाली २० वेळां शिक्षा झाल्या होत्या आणि गांवदेवी भागांत त्यानें अनेकवेळां घरफोड्या केल्या होत्या. आणि नुकताच तो ऑगस्ट १९५७ ला तुरुंगांतून सुटला होता.

१९५३ मध्यें घरफोडीच्या आरोपावरून जेव्हां त्याला पकडण्यांत आलें तेव्हां तो कुलाब्याच्या मॅजेस्टिक हॉटेलमध्यें रोजचे ३२ रु. आकार असलेल्या खोलींत रहात होता. त्याच्याजवळ घड्याळें, फौंटनपेने दोन रिव्हॉल्व्हर मिळून एकूण ५० हजार रुपयांचा माल सांपडला. हॉटेलमध्यें तो प्रिन्स राणा या नांवानेंच राहात, असे आणि अशा प्रकारें त्यानें पोलिसाच्या डोळ्यांत धूळ टाकली होती. त्याच्याजवळ घरफोडीचें सव साहित्य एक मजबूत दोर, एक दोरखंडाची शिडी, किल्यांचा जुडगा, चाकू, काळे जाकीट एवढ्या वस्तु सांपडल्या. त्या वेळीं त्याला निरनिराळ्या आरोपाखालीं पांच वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा झाली होती आणि आतां तो नुकताच तुरुंगातून सुटला होता. त्याचें आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे फॅशनेबल हॉटेलमध्यें राहायची त्याला संवय होती. त्यामुळें सुपरिंटेंडंट श्री. पिंटो यांनीं सर्व फॅशनेबल हॉटेलें धुंडाळलीं, पण प्रिन्स राणाचा कुठेंच पत्ता लागला नाहीं.

पण सततची चिकाटी यश देतेच. १९५८ च्या १६ जानेवारीला आम्हांला अशी बातमी लागली कीं प्रिन्स राणासारखा एक इसम ॲस्टोरिया हॉटेलमध्यें उतरला आहे. क्षणाचाहि विलंब न लावतां मी ॲस्टोरिया हॉटेलमध्यें गेलों आणि २०३ नं. ची खोली शोधून काढली. खोलीचा दरवाजा अर्धवट उघडा होता. प्रिन्स राणा एका खुर्चीवर बसला होता. त्याला कसलीहि हालचाल करण्याची संधि न देतां आम्हीं त्याला पकडलें. पंचनामा केला. त्यानंतर खोलीची कसून झडती घेतली. या झडतींत कपाटाच्या एका रिकाम्या खणाच्या मागें एका लोकरीच्या पिशवींत तीन मौल्यवान् हिरे सांपडले. शिवाय दोन फौण्टन पेनें, नवे कपडे, गुन्ह्याच्या जागेचा नकाशा व रोख ७३८ रुपये या वस्तु सांपडल्या. आम्ही लागलीच सौ. मुडींना बोलावणें पाठवलें. त्यांनी ती पिशवी, सिगारेटची पेटी आणि हिरे आपलेच आहेत हें ओळखलें. प्रिन्स राणाजवळ त्याची येरवडा तुरुंगांतून ४ जानेवारीला सुटका झाल्याचें रिलीज सर्टिफिकेटहि सांपडलें.

राणाला आम्ही गांवदेवी पोलिस स्टेशनवर नेलें. त्याच्या चेहेऱ्यावर आपण निर्दोष आहोंत असा आविर्भाव होता. ४ तारखेला त्याची सुटका झाली आणि ११ तारखेला त्यानें हा गुन्हा केला. म्हणजे ४ तारखेपासून ११ तारखेपर्यंतच्या काळांतील त्याच्या हालचालीचा तपास करणें ही महत्त्वाची गोष्ट होती. ही गोष्ट वरून क्षुद्र वाटली तरी याच तपासाला आम्हाला दोन महिने लागले.

आम्ही राणाच्या पूर्वेतिहासाच्या आणि पूर्वींच्या गुन्ह्यांच्या फायली बाहेर काढल्या आणि त्याचा बारकाईनें अभ्यास केला. यांतून असें निष्पन्न झालें कीं घरफोडीच्या या कामांत आणि या मालाची विल्हेवाट लावण्याच्या कामांत अब्दुल रहिमान आणि शेख सलाम या नांवाचे दोन सहकारी आहेत. प्रिन्स राणानें स्वतः कधींच चोरीच्या मालाची विल्हेवाट लावली नव्हती. त्यामुळें या दोन इसमांचा छडा लावल्याशिवाय राणानें आपला गुन्हा कधींच कबूल केला नसता.

शेख सलाम हा पुण्यांत रविवार पेठेंत राहात असल्याचा आम्हाला पत्ता लागला. आम्ही तडक मोटारीनें पुण्यास गेलों. पुण्याला आम्ही पहांटे पोचलो. आणि तेथें शेख सलामच्या पार्वतीबाई नांवाच्या बहिणीचें घर शोधून काढलें. तिच्या घराची झडती घेतल्यानंतर त्यांत प्रिन्स राणाची अनेक पत्रें सांपडली. पार्वतीबाईनेंहि कबूल केलें कीं ४ जानेवारीपासून राणा आपल्याकडेच राहात होता. १० जानेवारीला राणा आणि तिचा भाऊ असे दोघे गाडीनें कुठेंतरी गेले आणि ११ तारखेला संध्याकाळी फक्त राणा परत आला. त्याने नवीन कपडे, चपला, एक ॲटॅचीकेस विकत घेतलीं होती. १३ तारखेला राणा परत मुंबईला गेला पण सलामचा पत्ताच नव्हता.

हा पुरावा हातीं येऊनहि राणा आपलं मौन सोडीना त्याचं म्हणणं असं कीं या गुन्ह्याशीं त्याचा कांहींच संबंध नाहीं आणि सलामबरोबर तो पुण्यालाहि कधीं गेला नाहीं.

आम्ही परत मुंबईला आलों आणि सलामाचा तपास केला. त्याच्या खोलीवर तारमहंमद मुसा नांवाचा इसम होता त्यानें आम्हाला खोटेंच सांगितलें कीं सलाम आज संध्याकाळींच पुण्यास गेला. सलामच्या मागांवर आम्ही पुण्यांत एक कान्स्टेबल ठेवलाच होता त्यामुळें त्याच्या बोलण्यावर आमचा मुळींच विश्वास बसला नाहीं. त्याला घेऊन आम्ही खालीं आलों. पोलीस नाईक नझीर याचं समाधान न झाल्यामुळें त्यानें खालीं जमिनीवर झोंपलेल्या इसमांना उठवलं. अनेक लोक रांगेंत झोंपले होते. आणि त्याच लोकांत सलाम झोंपलेला आढळला.

याचा अर्थ असा कीं तारमहंमद उघड उघड खोटं बोलला. त्यानें असं खोटं कां सांगावं ? शेख सलाम आणि तारमहंमद या दोघांना आम्ही पोलीस स्टेशनवर नेलं. त्यांनीं या गुन्ह्यांत प्रिन्स राणाचा कांहीं संबंध आहे, ही गोष्ट नाकारली. सलामानें हें कबूल केलें कीं आपण राणाबरोबर १० जानेवारीस पुण्याहून मुंबईला गेलों. पण राणा कोठें उतरला आणि त्यानें काय केलें हें आपल्याला माहित नसल्याचें त्यानें सांगितलें. या चौकशींत आणखी एक गोष्ट निष्पन्न झाली आणि ती म्हणजे १२ जानेवारीला अब्दूल रहमान चंपीवाला राणाचा आणखी एक सहकारी बडोद्याला सलामच्या आजारी बायकोला भेटायला गेला.

इकडे राणानें पोलिसांना खोटी माहिती देऊन चकविण्याचा बेत केला. आपण १० जानेवारीला मुंबईला येऊन चोरी केल्याचे त्यानें कबूल केलें. आपण सकाळच्या गाडीनें कल्याण गांठलें तेथें शिवराम नांवाच्या एका खिसेकापूकडे चोरीचा माल विल्हेवाटीसाठीं दिला. शिवराम त्याला उरलेली रक्कम आणून देणार होता तर त्याचे दिवशीं पोलिसांनीं त्याला पकडलें. आपण कल्याणला गेलों होतों याच्या पुराव्यादाखल राणानें असें सांगितले कीं त्यादिवशीं कल्याण रेल्वे स्टेशनवर आपल्याला १०-३० वाजतां गफूर खुदाबक्ष नांवाचा एक केळींविक्या आणि माजी गुन्हेगार भेटला.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

प्रिन्स राणानें आम्हाला कल्याणला नेलं आणि गफुर खुदाबक्षची गांठ घालून दिली. गफूरनें कबूल केलं की राणा आपल्याला ११ तारखेला सकाळीं स्टेशनवर भेटला. पण राणानें आपण घाईंत असल्याचें दाखविलें आणि बहुधा तो मनमाड पॅसेंजरनें पुण्याला गेला असावा असाहि आपला तर्क त्यानें पोलिसांना सांगितला.

गफूरच्या या माहितीवरून राणाच्या १० ते १२ जानेवारीपर्यंतच्या हालचालीची रूपरेषा आमच्या ध्यानीं आली. पण १३ ते १५ जानेवारीपर्यंतच्या काळांत तो काय करीत होता ह्याचा पत्ता लागला नव्हता. राणानें आपण सुखलालजी स्ट्रीटवरच्या दोन वेश्यांच्या घरीं राहिलों असें सांगितलें. पण तेथें तपास केल्यावर ही माहिती खोटी असल्याचें आढळलें.

शेख सलामनें राणाचा नि आपला कांहींहि संबंध नसल्याचें सांगितले व त्यामुळें त्याला या प्रकरणांत गुंतवायचें नाहीं असें ठरवून राणा आपल्या जुन्याच जबानीला चिकटून राहिला. शिवराम आपल्याबरोबर येरवडा जेलमध्यें होता असें त्यानें सांगितल्यामुळें आम्ही राणाला घेऊन येरवडा येथें गेलों. पण तेथें कागदोपत्रीं शिवराम नांवाचा माणूस आढळला नाहीं.

३० जानेवारी १९५८ ला मला अशी माहिती मिळाली कीं शेख सलामला या गुन्ह्याची माहिती नाहीं ही साफ खोटी गोष्ट आहे. शेख सलाम मेमनवाडारोड वरच्या गणेशमल मारवाड्याकडे वारंवार जात असतो. त्याप्रमाणें आम्ही गणेशमलला गांठला आणि त्यानें कबूल केलें सलाम १४ जानेवारीला आपल्याकडे तीन हिरे आणि तीन घड्याळें घेऊन आला. पण तो माल आपल्याला पसंत नसल्यामुळें आपण तो परत केला. गणेशमलच्या या जबानीमुळें सलाम गडबडला आणि अखेर त्यानें कबूल केलें कीं प्रिन्स राणानेंच आपल्याला या वस्तु १३ तारखेला रात्रीं विकण्यासाठीं म्हणून दिल्या ! सलामनें दिलेल्या माहितीवरून तारमहंमद मुसा, हुसेन काळू आणि आणखी दोन मारवाड्यांकडून तीन घड्याळें मिळाली. सौ. मुडीनीं ती आपलीच आहेत असें ओळखलें. गणेशमलच्या दुकानाची आम्हांला तीन वेळां झडती घ्यावी लागली. त्याचं एक तळघर तर घड्याळं, दागिने यांनी खच्चून भरलेलं होतं. पण या तळघरांत सौ. मुडी यांचे दागिने कांहीं सांपडले नाहींत.

प्रिन्स राणा कांहीं केल्या खऱ्या गोष्टी सांगेना. त्यानें गणेशमल या गुन्ह्यांत साथीदार आहे असं सांगितलं. त्याप्रमाणें गणेशमल आणि कपूरचन्द यांना अटक करण्यांत आली.

सलामनें आणखी एक कबुलीजबाब दिला. प्रिन्स राणानें आपल्याला एक मॅंटिब्लॅक पेन आणि लेडीज रिस्टवॉच विकण्यासाठीं दिलं हें त्यानें कबूल केलं. नरोत्तम डोशी आणि मह्र नइपुरी यांच्याकडून या वस्तु आम्ही हस्तगत केल्या.

इतक्या सगळ्या व्यापानंतर प्रिन्स राणा कबूल झाला कीं फक्त या वस्तु आपण १९५७ मध्यें बंगलोरहून येतांना गुंटकळ स्टेशनवर चोरल्या. माझ्या हेड कॉन्स्टेबलनें पुणें रोड, गुंटकळ आणि बंगलोरपर्यंत जाऊन तपास केला पण या वस्तूंचा मालक कोणीच कुठें आला नाहीं.

अबदुल रहिमान मालीशबाल्यानें आम्हाला बातमी दिली कीं प्रिन्स राणानें सांगितलेला शिवराम हा दुसरा तिसरा कोणी नसून महंमद अस्लाम नांवाचा एक खिसेकापू असावा. मी मुंबईच्या व सेंट्रल आणि वेस्टर्न रेल्वेच्या मोडस आपरेंडी ब्यूरोकडे जाऊन तपास केला. तर सेंट्रल रेल्वेच्या रेकॉर्डवर महमद अस्लामची एक खिसेकापू म्हणून नोंद आढळली. या खिसेकापूचाहि आम्ही पत्ता लावला पण त्याच्याकडून कसलाच मुद्देमाल मिळाला नाहीं. मात्र या सगळ्या तपासांत १ महिना गेला. राणावर आरोप शाबीत होईल असला कसलाच पुरावा हातीं आला नाहीं. गुन्ह्याच्या तपासाबाबत आम्ही जरा साशंकच झालो. हातीं आलेला मुद्देमालहि किरकोळ होता. शिवाय सौ. मुडीना इंग्लंडला जायची घाई होती त्यामुळें ही केस १ मार्चपर्यंत मिटवून टाकण्याची आवश्यकता होती. त्यामुळें कांहीं अशीं नाईलाजानेंच ७ मार्च १९५८ ला इंडियन पीनल कोड च्या ४२७-३८०, ११४-४१४ या सेक्शनखाली चार्जशीट भरला आणि केस

[ पान ५१ वर पहा ]

## निर्भत्सना

तुझ्याकडून मला जें जें हवं आहे तें तें देण्यास तूं
खुशाल नकार दे.
तुझं शरीर मला हवं आहे—तेंहि वाटल्यास देऊं नकोस.
बेधडक नाहीं म्हण !
दाणे म्हणून खातात माणसाचे डोळे तुझे नातलग.
पिण्यासाठीं वापरतात ते माणसाच्या कवट्या.
बटाटे म्हणून भाजून खातात माणसाचीं बोटें.
वाटेल तितक्या वेळां तूं मला नकार दे.
वाटेल तितक्या वेळां तूं माझा अव्हेर कर.
पण एकच लक्षांत ठेव—
माझ्याखेरीज कुणीच तयार होणार नाहीं
तुझा स्वीकार करण्यास !

— एक आफ्रिकन गाणें



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# जर्मनी :

## राया प्रभू यांच्या आयुष्यांतला एक 'अचानक' योग

ज्योतिषी माझ्या हातावरच्या रेषा विशेष लक्षपूर्वक पाहूं लागला आणि पांचदहा सेकंदांचा अवधी स्तब्धतेचा जाऊं लागला, कीं मला ती स्तब्धता असह्य होई. परदेशगमनाचा योग मला आहे किंवा नाहीं, या प्रश्नाचा एका झटक्यांत उत्तर देऊन त्यानें निकाल लावावा असें मला नेहमींच वाटे; पण 'नरो वा कुंजरो वा' अशीं उत्तरें मात्र सदैव संभ्रमांत ठेवीत असत! माझ्या अतीव इच्छेचा हा प्रश्न भविष्यवेत्त्यांकडून असा आशानिराशेंत खेळवला गेला असल्यानें, वैतागून तो आतांशा मी सोडूनहि दिला होता. या मृगजळाच्या मागें लागण्यांत अर्थ नाहीं. अशी मनाची पक्की खात्री करून घेतली होती. हळुहळु त्याचा मला विसरही पडूं लागला होता; अगदीं ३१ जानेवारी १९५९ पर्यंत तरी!

'अचानक' हा शब्द माझ्या रोमरोमांत भिनलेला आहे आणि ओंठावर तर तो वाराहि आमंत्रण येतें, अचानक जावें लागतें, अचानक जीव धोक्यांत घालावा लागतो—सारेंच अचानक! काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंतहि मला फिरावें लागलें तेंहि असेंच, 'अचानक'!

अशीच एक फेब्रुवारी महिन्याची सकाळ. एका जाहिरात कंपनीला दिलेल्या वचनाला जागून काम पुरवायच्या विवंचनेंत मीं ऑफिसमध्यें पाऊल टाकलें. माझ्या टेबलावर पडलेल्या आजच्या टपालांत जर्मन वकिलातीकडून आलेलें पत्र पाहून मला विशेष औत्सुक्य वाटलें नाहीं, असेल एखाद्या पाव्हण्याचा फोटो घ्यायचें आमंत्रण म्हणून दुर्लक्षून आधीं पुरें करायच्या कामाच्या योजनेसाठीं मीं माझ्या सहकाऱ्याला हांक मारली. 'डार्करुम' मधून तो येईपर्यंत एक दोन मिनिटें सहज लागणार होतीं, तोंपर्यंत







ताव असतोच, कारण प्रमुख बातमीदार आणि छायाचित्रकार यांना सारेच प्रसंग अचानकच साजरे करावे लागतात. अचानक घडलेल्या घटनेची जशी जोरदार बातमी होते तसेंच अशा अचानक घटनेचें छायाचित्रहि सनसनाटी असतें. छाया-चित्रकाराला अचानक पत्रव्यवहार उघडून तरी पाहूं म्हणून मी पहिलं पत्र उघडलं तें जर्मन वकिलातीकडून आलेलं. आणि आंतला मजकूर पाहून मला आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसला, माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना! पुन्हा पुन्हा मीं वाचून पाहिलें, माझ्या सहकाऱ्यालाही वाचायला दिलें. जो ध्यानीं, मनीं, स्वप्नांतहि नव्हता तो 'परदेशगमनाचा योग' आला होता; अगदीं अचानक आला होता. तीन पत्रकारांबरोबर जर्मनीला भेट द्यायला माझीहि नियुक्ति झाली होती.

खऱ्याखोट्याचा शहानिशा करण्याकरितां पत्रांत ज्यांचा उल्लेख होता ते जवळचे पत्रकार—सहप्रवासी श्री. मंडी (संपादक इलस्ट्रटेड विक्ली) यांना मीं फोन करून विचारलें; परंतु पुढच्या व्यवस्थेसंबंधीं तेच माझ्याजवळ चौकशी करायला लागल्यावरून माझ्या धांवपळीला पारावार राहिला नाहीं. स्टुडियोची सारी व्यवस्था सहकाऱ्यांकडे सोंपवून पुढच्या तयारीला मला लागायचें होतें.

\+ + +

विमानानें मीं नेहमींच प्रवास केला असल्यानें त्याचें नाविन्य मला नव्हतें. मला नाविन्य होतें तें परदेशाचें. आणि त्याचेंच दर्शन घ्यायला मीं उत्सुक होतों.

कां कोण जाणें, परंतु साऱ्या प्रवासांत माझ्या मनःचक्षुपुढें 'बिस्मार्क, कैसर, हिटलर, गोअरींग, गोबेल्स, हीं इतिहास प्रसिद्ध नावें उगाचच नाचत होतीं. दुसऱ्या महायुद्धांत नानातऱ्हेच्या आपत्तींतून गेलेला, जवळ जवळ भुईसपाट झालेला असा हा



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## निवेदक—गोपाळकृष्ण भोबे

नामवंत देश मला कसा दिसेल, याचें एक काल्पनिक दृष्य डोळ्यांसमोर कसेंतरी उभें राहात होतें.

'ड्रसेल ड्राफ' ह्या भव्य विमानतळावर उतरल्यावर—आम्हीं सरकारी पाहुणें असल्यानें,—आमची व्यवस्था ज्या राजेशाही हॉटेलमध्यें करण्यांत आली होती—तिथें गेलों. व्हरांड्यांत येऊन मीं भोंवतालच्या आसमंतांत नजर टाकली. कुंद अशा त्या वातावरणांत आकाशांतून कुणीतरी दळलेली साखर ओतीत असल्यास मला भास झाला. कांहीं अमेरिकन चित्रपटांतूनच बर्फ पडण्याचें असलें दृश्य मीं पाहिलें होतें. पडद्यावरचें तें दृश्य प्रत्यक्षांत पाहातांना एक निराळाच नवा अनुभव येत होता. समोरच 'ऱ्हाइन' नदीचें विस्तीर्ण पात्र होतें. नदीकांठच्या ह्या शांतप्रदेशाकडे पाहतांना मला गोव्यांतल्या 'पणजी' शहराची सारखी आठवण होत होती. 'मांडवी' नदीच्या कांठावर वसलेल्या त्या



टुमदार शहराची, आणि याची जडण घडण, याच्यांत बरेचसें साम्य आढळलें. बाहेर व्हरांड्यांत असून देखील एखाद्या शीतलागारमध्यें असल्यासारखें वाटत होतें.

दुसऱ्या दिवशीं 'हंबूर्ग'मध्यें जायला निघालों. आमची व्यवस्था ज्या लोकल ट्रेनच्या डब्यांत केली होती तो 'हॉट एअरकंडिशन' चा होता. हंबुर्गच्या स्थानकावर गाडी थांबली. वाटलं आतां हमालांची गर्दी होणार. आम्ही परदेशी असल्यानें त्यांतले कांहीं आमच्यावर तुटून पडतील; परंतू तसें घडलेंच नाहीं. सारें कसें शांत शांत चाललें होतें. कुठेंही गडबड धांदल नाहीं, कीं आदळ आपट नाहीं. हमाल डब्यांत आलाच नाहीं, इतर स्थानिकां प्रमाणें आम्हींही आमच्या बॅगा उचलून घेऊन उतरलों. आजच्या दिवसांतच ह्या शहरांतिल विशिष्ट स्थळें पाहून घेऊन, संध्याकाळीं याच स्थानकावरून पुढें निघायचें होतें. दुभाषी वाटाड्यानें हातगाडी घेऊन एका 'पोर्टर'ला बोलावलें. आणि सर्व सामान त्याच्या स्वाधीन केलें. संध्याकाळपर्यंत तें तो संभाळणार होता. मीं त्याला नंबर विचारला, आणि त्याच्या दंडावर किंवा कुठेंतरी एखादा नंबराचा बिल्ला दिसतो का पाहूं लागलों; परंतू इथल्या पोर्टराना नंबरच नसल्याचें जेव्हां आमचा दुभाषी म्हणाला, तेव्हां थोडीसी धास्ती वाटायला लागली. ज्याची कांहींच खूण आपल्याजवळ नाहीं अशा एखाद्या हमालाकडे सारें सामान दिवसभर ठेवायचें म्हणजे...परंतू मीं पाहुणा असल्यानें शिष्टाचाराला सोडून वागूं शकत नव्हतों. ज्या आपल्या देशांत परदेशी पाहुण्याचें सामान हातोहात लांबवलें जातें, त्याच देशांतून मीं आलेलों असल्यानें अशीं भीति मनांत असणें स्वाभाविक होतें; परंतू दिवसभराचा कार्यक्रम आटोपून आम्हीं संध्याकाळीं स्टेशनवर आलों, तों तो पोर्टर सामान घेऊन आमचा डबा यांबणाऱ्या जागीं



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आधींच येऊन उभा राहिलेला दिसला. गाडी येतांच डब्याच्या दारांत सामान ठेवून मोबदला घेऊन तो निघून गेला. डब्यांतल्या इतर 'जंटलमन्'नीं आमचं सामान व्यवस्थित लावायला आम्हाला मदत केली.

इथली ही सारी 'लोकल ट्रेन' वाहातुक 'रशियन' लोकांच्या हातांत असल्याचें ऐकून नवल वाटलें.

'क्रुपचा' विशाल कारखाना पाहिला. दीडशें टन वजन उचलणारी प्रचंड क्रेन, आणि ती चालवणारी एक बाई पाहून थक्क झालों. आमच्याकडच्या जास्तींत जास्त 'टाइपरायटरशीं' गुंजन करणाऱ्या किरकोळ-कामी स्त्रियांची आठवण आली.

एका कमानीवजा दिसणाऱ्या, रस्त्याच्या मधोमध असलेल्या महाद्वाराकडे एक 'मॉडेल' उभे करून एक छायाचित्रकार मांडणी करण्यांत गुंतला होता. रस्त्यांतून असंख्य लोक जात येत होते; परंतु चुकूनही त्या गोष्टीची दखल घेत नव्हते, किंवा डुंकूनही पाहात नव्हते. मला मात्र कुतुहलानें राहवेना. मी तें दृष्य पाहात राहिलों. ती बाई छायाचित्र-कारानें सांगितल्याप्रमाणें निरनिराळ्या अवि-र्भावानें उभी राहात होती. माझ्या गळ्यांतल्या 'कॅमेऱ्यानें' मी तें दृष्य अनेक बाजूंनीं टिपून घेतलें. आपलें काम आटोपून तीं दोघं जात असतांना मीं त्यांना ओळख दिली. आणि स्वागत करून त्यांनीं माझें अभिनंदन केलें. त्यांच्या पाठमोऱ्या आकृतिकडे पाहून माझें मन गतकालांत विहरत होतें. असाच मी एकदां 'गेटवे ऑफ इंडिया' जवळ 'मॉडेल' उभें करून 'कॅमेरा' लावीत होतों; परंतु कमींत कमी सात आठशें माणसें जमून त्या बघ्यांनीं मला नकोजीव करून टाकला होता. शेवटीं पोलिस येऊन त्यांनी माझें च चंबुगबाळें उचलून बाजूला केलें आणि 'टॅक्सी' गांठून मलाही 'पःपलायते' करण्यावांचून गत्यंतर राहिलें नाहीं. फर्लांग फर्लांगाच्या अंतरावर इथें प्रेमि-कांचें कूजन आढळतेंच. बाजूनें जाणाऱ्या पादचाऱ्याना त्याची दादही नसते, ते चुकून देखील पाहात नाहींत. माझे डोळे मात्र भिरभिरत होते; परंतु इतर लोकांचें वर्तन पाहून मींच लाजल्यासारखा होत होतों.

बर्लीन शहरांतल्या प्रचंड इमारतीं, मोठ-मोठे रस्ते, यंत्रासारखी चाललेली वाहतुक वगैरे गोष्टी पाहून डोळे दिपून गेले. मात्र रस्त्यांतल्या वर्दळींत पुरुषांपेक्षां बायकाच अधिक दिसल्या. सहप्रवासी 'मंडी' यानीं यासंबंधीं आमच्या दुभाषाजवळ कुतुहल व्यक्त केलें. आणि हा दुसऱ्या महायुद्धाचा परिणाम असल्याचें सांगून गणसंख्येंत पुरुषांच्या मानानें बायकांचें प्रमाण तिप्पट असल्याचेंही निदर्शनास आणलें. दुसऱ्या महायुद्धाच्या परिणामाचा अवशेष असा हा एवढाच आढळला.

थोड्याच वर्षापूर्वींच्या युद्धानें जर्मनीला बेचिराख केला. त्याची खूण आम्ही पाहिलेल्या स्थळांत औषधालाही आढळली नाहीं. मात्र मोठमोठी 'कॅथेड्रल्स्' किंवा तत्सम प्रचंड इमारती त्याच्या खुणा बुजवूं शकलेलीं नाहींत, हें तशाच सुक्ष्म दृष्टिला आढळल्यावांचून राहात नाहीं.

लहानसेंच, टुमदार आणि मनमोहक 'लुबेक' खेडें पाहिलें. शनिवार, रविवार हे तिथें गर्दीचें दिवस. प्रतिष्ठित लोक, मनरंजनासाठी 'कॅझिनो' हा फिरकीचा जुगार तिथें मोठ्या प्रमाणांत खेळतात. कॅझिनोच्या टेबला-भोंवती बसलेल्या लोकांच्या पाठून, एक फिडलवाला नानातऱ्हेचे अंगविक्षेप करीत फिडल वाजवित फिरत असतो. त्याला दाद दिली, की 'टीप'साठीं तो उभा राहतो. आणि ज्याने दाद दिली त्याने त्याला 'टीप' द्यावीच लागते. तिथले लोक संवयीने त्याच्याकडे बघतच नाहींत. मीं नवखा असल्यानें, त्याच्याकडे पाहात राहिलों आणि अकारण मला चार पांच मार्कांचा भूर्दंड सोसावा लागला.

एका मध्यमवर्गीय संगीत प्रविणाकडे पाहुणचार घ्यावा लागला. आपल्या छोट्याशा आणि युद्धानंतर स्वताच्या हातांनीं बांधलेल्या घरकुलांत त्यानें आमचें आठवणींत राहाण्या-सारखें स्वागत केलें. हिंदुस्थानीं संगीताबद्दल त्याला अजिबात कल्पना नसल्याचें दिसलें; परंतु तें जाणून घेण्याची आस्था दिसली. इंडो-जर्मन सोसायटीनें याबाबतींत प्रयत्न केल्यास त्याची आम्हांला कल्पना येईल असेंहीं तो म्हणाला.

हिटलरच्या बाबतींत मीं एका साध्या माणसाला प्रश्न केला होता. "आतां यां घटकेला आम्हीं तें सारें विसरून गेलेलों आहोंत. पुन्हा त्याची आठवण नको, आणि त्याची कांहीं गरजही नाहीं!" एवढें उत्तर देऊन तो पुढें प्रेमानें म्हणाला होता" आपण दुसरें कांहीं तरी बोलुं या!" मीं मात्र खजिल झालों होतों!

× × ×

जर्मनींहून परततांना माझ्या मनांत एकच विचार होता, चौदा वर्षांपूर्वी जिथें सर्व कांहीं नामशेष झालें होतें, जिथलीं छायाचित्रें पाहून भयाकूल अवस्था होई, त्याचा मागमूसही आज ह्या भूमित दिसत नाहीं. तो काल आणि तीं वर्णनें, नवख्या माणसाला काल्पनिक पुराणकथाच वाटाव्या! कारण हा अविश्रांत उद्योग करणारा देश स्वप्नांत वावरत नाहीं!

● ● ●



हम सब आठ है।

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

*सकाळीं कडकडींत उन्ह, दुपारीं*
*धोधो पाऊस आणि रात्रीं*
*बिनवाऱ्याची थंडीं अशा वर्षभर*
*एकच ऋतु असलेल्या*

# ‘सिंह’ पूरांत

—अनंत काणेकर




एका कोपऱ्यांत तेलाच्या बाटल्या दिसल्या. त्या कशाकरतां म्हणून विचारतां, मूर्तीसमोरच्या दिव्यांत कांहीं भक्त हें तेल विकत घेऊन वहातात, म्हणून त्यानें सांगितलें. तो म्हणाला, ‘आतां सहा वाजलेत. साडेसातला तुम्ही परत याल तर तुम्हांला इथें एक व्याख्यान ऐकायला मिळेल. सिलोनहून एक ‘थारा’ (स्थविर ?) इथें आलेत. त्यांचें इंग्रजींत व्याख्यान होणार आहे. चिनी स्त्रीपुरुषांकरतां त्याचें तात्रडतोब चिनी भाषेंत भाषांतर सांगण्यांत येईल.’ ‘आम्हाला फार आनंद झाला असता, पण आम्हाला बोटीवर जायचें असल्यामुळें येतां येणार नाहीं त्याचें वाईट वाटतें.’ आम्ही म्हणालों. आपण या मंदिरांत काम करतों, आपलें नांव आन्पॉंग, तो म्हणाला. फिरत फिरत मंदिराच्या मागल्या बाजूला आम्ही गेलों. तिथें एका मोठ्या थोरल्या दालनांत एक लांब टेबल व खुर्च्या होत्या. टेबलावर बरेचसें रंगीत कांचेचे कप होते आणि एका उभ्या भांड्यांत पाणी होते. बऱ्याचशा चिनी म्हाताऱ्या तिथें शांतपणें बसलेल्या दिसल्या. मंदिर पाहून झाल्यावर आन् चॉंगचे आम्हीं मनःपूर्वक आभार मानले, आणि बाहेर पडलों—

आवारांत लालहिरवीं फुलझाडें डुलणाऱ्या, पिनांग पोलीसांचें मुख्य ठाणें असलेल्या नव्या कोऱ्या भव्य पांढऱ्या इमारतीवरून आम्ही पिनांगच्या बाजारांत आलों. आतां काळोख पडत होता. कसला तरी असह्य उग्र दर्प मधून मधून नाकांत शिरत होता. ‘कसला रे हा वास ?’ आम्ही मोहनला विचारलें. तो म्हणाला, ‘ती पहा रस्त्यावर विकायला ठेवलींत त्या दुर्यान फळांचा हा दर्प आहे.’ फणसांसारखेंच बाहेर कांटे असलेलें हें फळ आहे. फणसहि पिकूं लागला कीं त्याचा उग्र वास आजूबाजूला पसरतो. पण दुर्यानच्या दर्पानें डोकें फिरून जातें. हे लोक आवडीनें हें फळ विकत घेऊन कसें खातात कुणाला ठावूक !

एका तामीळ मुसलमानाच्या लहानशा पुस्तकाच्या दुकानांत वर्तमानपत्रें दिसलीं. ‘संडे गॅझेट’ आणि सिंगापूरचें ‘इंडियन डेली न्यूज’ मी विकत घेतलें. बातम्या तरी काय आहेत म्हणून पहातां इकडल्या राजकारणांतल्या मलायी-हिंदी-चिनी त्रांगड्याचें चांगलेंच दर्शन झालें. मलायी ट्रेड युनिअन कॉंग्रेसनें म्हणे लिखित नसला तरी असा अलिखित नियम मान्य केला होता, कीं कॉंग्रेसच्या अध्यक्ष्यस्थानीं एकदां मलायी, एकदां चिनी, एकदां हिंदी असे आळीपाळीनें अध्यक्ष निवडले जावे ! केलान्तनच्या सुलतानाच्या अनेक बायकांपैकीं एकीनें कुठल्या तरी राजकीय सभेंत भाग घेतला म्हणून तिथली मलायी जनता खवळल्याची दुसरी बातमी होती ! आशियाई चित्रपट महोत्सवांत नऊ जपानी आणि तीन मलायी चित्रपटांना बक्षिसें मिळालीं होतीं. एका मलायी चित्रपटाचें नांव ‘सलामत हरि राया’ ! ‘हरिराया’ म्हणजे मोठा दिवस.

सात सव्वासातच्या सुमारास ठाकोरलालांच्या घरीं पोहोंचलों. त्यांचे आणि त्यांच्या चलाख भाच्यांचे पुन्हां पुन्हां आभार मानून आमच्या ‘कॉर्फ्यु’ बोटीकडे—म्हणजे आमच्या तरंगत्या घराकडे जायला निघालों. वाटेंत पिनांगचे रेल्वेस्टेशन दिसलें. रेल्वेस्टेशन बंदराजवळच आहे. रेल्वेस्टेशन याचा अर्थ इथून रेल्वे जात नाहीं. इथें तिकिट घ्यायचें आणि लॉंचमध्यें बसून समोर मलायाच्या मुख्यभूमीवरल्या स्टेशनांत जायचें. तिथून मलायाची राजधानी कुआला लंपूर किंवा सिंगापूरला जाण्याकरतां एक रात्रीं आणि एक सकाळीं अशा दोनच गाड्या सुटतात असें ऐकलें. रात्रीच्या गाडीची लॉंच नुक्तीच सुटून गेली होती, आणि स्टेशनांत शुकशुकाट होता.

बोटीवर गेलों तेव्हां सव्वा आठ झाले होते. डायनिंग हॉलमध्यें जेवण्याकरतां गेलों तों पिनांगला चढलेले कांहीं नवे चिनी स्त्री-पुरुष तिथें जेवत असलेले दिसले. आम्ही बसलों त्या टेबलावर एक तरुण चिनी आणि एक चिनी स्त्री जेवत होतीं. आंतरराष्ट्रीय बॅड्मिन्टनचे सामने सिंगापुरांत परवांपासून सुरूं व्हायचे आहेत ते पहायला तो चिनी तरुण चालला होता. तुमचा नंदू नाटेकर खेळणार आहे, त्याचा खेळ पहायला मी फार उत्सुक आहे, तो मोठ्या उत्साहानें आम्हांला सांगत होता.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

चिनांग म्युनिसिपालिटींत आपण कामाला आहोंत, पण वृत्तपत्रांसाठी खेळांची परीक्षणेंही लिहितों. तो म्हणाला.

जेवल्यावर डेकवर येऊन बसलों तेव्हां थंड वाऱ्याच्या झुळुकावर झुळुका येत होत्या. या विषुववृत्ताजवळच्या प्रदेशांतहि थंड झुळुका येतात म्हणायच्या केव्हां केव्हां! वरती आकाशांत असंख्य निळसर पांढरे तारे लखलखत होते, आणि बंदरांतल्या अनेक बोटीवर लुकलुकणारे लाल, हिरवे, पांढरे दिवे त्यांच्याशीं पोरकट स्पर्धा करण्याचा प्रयत्न करीत होते!

बोट रात्रीं बारा वाजतां पिनांग बंदरांतून बाहेर पडली.

### ता. २३ मे १९५५

आज सकाळीं डेकवर आलों तेव्हां समुद्र अगदीं शांत होता, पण उकाडा फार होत होता. सकाळीं ११–३० च्यां सुमाराला समुद्रावर दूर दोन बोटी पुढें चालल्या आहेत आणि त्यांच्या मागून कांहीं अंतरावर एक मोटं थोरलें चौकोनी घर तरंगत येतं आहे असें दृश्य दिसत होतें. कांहीं वेळानें ध्वनिक्षेपकावरून सांगण्यांत आलें कीं एक मोठी तरती गोदी त्या दोन बोटी ओढून नेत आहेत.

आमच्या बोटीवर दमणचे बरेच खारवे खलाशी म्हणून आहेत. शिड्या लावणें, दोरखंड बांधणें, झाडलोट करणें वगैरे कामें ते करतात. त्यांचा सारंग उमद्या चेहेऱ्याचा धिप्पाड गडी आहे. लांब निळा झब्बा, कमरेला लाल फडकें, डोक्यावरल्या गोल पांढऱ्या टोपीभोंवतीही लाल फडकें, गळ्यांतल्या लांबलचक सांखळीला शिट्टी. अशा वेषांत तो खलाशांच्या कामावर देखरेख करीत असतो. त्याची भाषा गुजराती असली तरी मराठीही मोडकी तोडकी त्याला बोलता येते. वर्तमानपत्रांत दमणची किंवा गोव्याची बातमी काय आहे याची पुष्कळ वेळां माझ्याकडे तो चवकशी करतो. बोटीवरल्या युरोपियन बायकांचे लांडे कपडे, त्यांचं कुणाबरोबरही नाचणें गाणे, गळ्यात गळा घालून फिरणे यासंबंधीं आज दुपारीं माझ्याबरोबर तो बोलत होता. 'देखो साब,' तो म्हणाला, 'वीस वर्षं निरनिराळ्या बोटीवर कामं करतोंय, सर्व जग पाह्यलं, पण आपल्या हिंदी बायकांसारख्या बायका नाहींत कुठं!'

संध्याकाळीं ५ वाजतां डाव्या बाजूला किनारा आणि डोंगरांच्या रांगा अस्पष्ट दिसताहेत. रात्रीं साडेसातला तर किनाऱ्यावर पुष्कळसे लखलखीत निळे दिवे दिसूं लागले. कुणी म्हणाला, तें पोर्ट डिक्सन. आतां रात्रीं साडेआठच्या सुमाराला आम्हीं मलाकाच्या सामुद्रधुनीमधून जातों आहोंत; आणि मधून मधून दोन्ही बाजूंना दीपगृहांचे प्रकाशझोत दिसताहेत.

### ता. २४ मे १९५५

सिंगापूर बंदराच्या धक्क्याजवळ बोट हळूहळू सरकत होती. सकाळचे आठ सव्वाआठच वाजले होते; पण विषुववृत्ताजवळचा सूर्य अंग भाजून काढूं लागला होता. सिंगापूर मुंबईसारखेंच बेट आहे. एका टोंकाला मुंबईच्या वाळकेश्वर–मलबारहिल भागासारख्याच दाट हिरव्यागार झाडींनें भरलेल्या भागांतल्या घरांचीं छपरें दिसत होतीं. समोर मुंबईच्या बॅलार्ड पियरसारखाच धक्का, यार्ड्या, वखारी वगैरे दिसत होत्या. साडेआठला बोट धक्क्याला लागली. दोन दिवस सिंगापुरांत थांबणार. कपडे करून गांवांत जायच्या तयारींतच आम्ही होतों. भारतांतल्या युनायटेड् कमर्शियल बँकेच्या सिंगापूर शाखेचे मॅनेजर श्री. चिंतामणराव सोनाळकर यांना माझ्या मुंबईंतल्या मित्रांनीं पत्र लिहिलेलें होतें. उतरल्याबरोबर त्यांच्या ऑफिसांत जायचें ठरवलें होतें. डेकवरून धक्क्याकडे पहात उभे होतों, इतक्यांत बोटीच्या शिडीवरून उंच, गोरटेलेसे, अद्यावत् पोशाख केलेले, हातावर कोटाची घडी टाकलेले एक गृहस्थ गर्दीतून वाट काढीत डेकवर आले, आणि इकडे तिकडे पाहूं लागले. माझ्याकडे पहातांच 'तुम्हीच काणेकर?' म्हणून त्यांनीं विचारलें. ते सोनाळकरच होतें. मला न्यायला ते स्वतः गाडी घेऊन आले होते. बाहेर त्याची मोठी थोरली शेव्हरोलेट गाडी उभी होती. सिंगापुरांत लहान सहान, जुन्या पुराण्या गाड्या दिसतच नाहींत. हें खुलें बंदर आहे. कसल्याच प्रकारची जकात नाहीं. त्यामुळें मोटारी, कॅमेरे, घड्याळें वगैरे वस्तू इथें मुंबईच्या मानानें निम्मेहून कमी किंमतीला मिळतात.

मुंबईप्रमाणेंच सिंगापूर हें एक दलदलीनें भरलेलें कोळ्यांचें खेडें होतें. मुंबईप्रमाणेंच ब्रिटिशांनी त्याला एक जगांतलें अव्वल दर्जाचें बंदर आणि शहर बनविलें. बंदराच्या बाहेर आल्यावर रस्ते, इमारती वगैरे पाहून कमी गर्दीच्या पण अधिक व्यवस्थित अशा मुंबईंतच आल्यासारखे वाटलें. सोनाळकरांच्या एअरकंडिशंड ऑफिसांत चहापाणी झाल्यावर त्यांचा मोठा मुलगा अतुल याला त्यांनीं मोटारींत आमच्या बरोबर दिला, आणि दुपारीं बारा-साडेबारापर्यंत आम्हाला सिंगापुरांत फिरवून जेवायला घरीं घेऊन यावयाला सांगितलें. दोन दिवसांत जास्तींत जास्त सिंगापुरांत काय पहातां येईल त्याचा कार्यक्रम माझ्यासाठीं सोनाळकरांनीं ठरवून टाकला होता; आणि त्यांना सकाळीं ऑफिसांत पोहोंचवल्यानंतर मोटार रात्रींपर्यंत आम्हालाच देऊन टाकलेली होती. ज्यांना पाहिल्याबरोबर आनंद होतो अशी कांहीं जात्याच सज्जन आणि सुस्वभावी माणसें मला भेटलीं आहेत. त्यांच्यांत सोनाळकरांची मी प्रमुखत्वानें गणना करीन.

मुंबईचा जसा मोठमोठ्या इमारती, कोर्टें, कचेऱ्या असलेला फोर्ट विभाग तसाच सिंगापुराचा 'रॅफल्स् प्लेस्' हा भाग. मात्र मुंबईंतल्या फोर्ट विभागाइतका हा मोठा नाहीं. मुंबईच्या प्रख्यात 'व्हाइट वे लेड लॉ' या स्टोअर्सची तशीच दिसणारी शाखा इथें दिसली. सोनाळकरांच्या बँकेसमोरच कम्युनिस्ट चीनची अठरा मजली 'बँक ऑफ चायना' इमारत बांधली जात आहे. सिंगापूर ब्रिटिश साम्राज्यांत असलें तरी त्याला मर्यादित अधिकारांचें विधिमंडळ आहे, विधिमंडळाची पांढरीशुभ्र इमारत भव्य आहे. पांढऱ्या दगडाच्या बैठकीवर काळ्याकुळीत दगडाचा कोरीव हत्ती इथें पाहिला. 'सिंह'पुरांत हा हत्ती कशाला? हायकोर्टाच्या इमारतींत फिरतांना पब्लिक गॅलरींत बसून एखादा खटला थोडावेळ पहावा असा विचार केला; पण न्यायाधीश यावयाला बराच वेळ आहे, असें कळलें तेव्हां बाहेर आलों–

सिंगापुरांतले मोठमोठे रस्ते मुंबईंतल्या सारखेच, पण अधिक स्वच्छ, चकचकीत वाटतात. त्याचप्रमाणें मोकळ्या जागा आणि झाडें झुडुपें हिरवींगार दिसतात. मोठमोठ्या अद्यावत् इमारती, स्वच्छ रुंद रस्ते आणि जिकडेतिकडे हिरवींगार झाडेंझुडुपें, हिरवळ यामुळें थंड युरोपियन देशांतल्या शहरासारखें सिंगापूर दिसतें. थंड, हिरवेंगार, पण

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

हवा मात्र खरखीत उष्ण आणि मुंबईपेक्षां दमट, घामाच्या धारा वहायला लावणारी. युरोपियनांनी यूरोपचें बाकी सर्व इथें आणलें; फक्त हवा आणूं शकले नाहींत. रस्ते स्वच्छ चकचकीत, धुळीचा कणहि नसलेले याचें कारण सिंगापुरांत बारामहिने बहुधा दररोज दुपारीं तीन चारच्या सुमाराला जोराचा पाऊस पडून जातो. जवळ जवळ विषुववृत्तावरच सिंगापूर असल्यामुळें—इथें म्हणे बारा महिने एकच ऋतू असतो. पहाटेपासून कडकडीत, स्वच्छ सोनेरी ऊन, संध्याकाळीं जोराचा पाऊस, पुन्हां थोडा वेळ ऊन आणि रात्र. हवेखेरीज बाकी सर्व युरोपसारखें वाटायचें आणखीं एक कारण म्हणजे रस्त्यावर मला कुठें कुत्रे,घोडे, बैल किंवा बैल गाड्या दिसल्या नाहींत. मुंबईप्रमाणेंच रस्त्यावरल्या मोटारीच्या वहातुकीचें नियंत्रण करण्याकरतां इथेंहि आपोआप विझणाऱ्या पेटणाऱ्या हिरव्यालाल दिव्यांचे खांब आहेत; पण विशेष म्हणजे कांहीं रस्त्यावर पायीं जाणाऱ्या लोकांसाठीं कडेला एक बटण दाबायची सोय आहे. मोटारींची किंवा बस गाड्यांची फार वेळ सारखी रांग लागली आणि रस्ता ओलांडणें कठीण झालें तर कुणींहि बटन दाबावें म्हणजे लाल दिवा लागतो, आणि वहातुक थांबते. मिनिट दीड मिनिटांनीं तो दिवा आपोआप विझत असावा.

मोठ्या रस्त्यावरून आंत गेल्यानंतर मुंबईतील हमाम स्ट्रीट, दलाल स्ट्रीट सारख्याच छोट्या गल्ल्या, बोळ दिसूं लागले. आमच्या फोर्टमधल्या गल्ल्यांत सुटांतले किंवा शर्ट पॅन्टमधले काळे सावळे हिंदी लोक दिसतात, तर इथें तशाच कपड्यांतले पिवळे गोरे चिनी लोक घाईघाईनें आपल्या कामधंद्यासाठीं जात असलेले दिसले. हिंदू किंवा मुसलमान फेरीवाल्याऐवजीं चिनी फेरीवाले हातगाड्यावरून किंवा लाकडी खोपटांत लिंबाचा रस, संत्र्यांचा रस किंवा उसाचा रस विकत होते. शहराच्या आंत आंत गेलों तेव्हां कांहीं गल्ल्यासारख्या वाटल्या. तशीच घाण, तशीच गर्दी, मात्र चिनी स्त्रीपुरुषांची. मुंबई हें जसें बेट आणि महाराष्ट्राचें, तसेंच सिंगापूर बेट आणि मलायाचे. पण सिंगापूराच्या अकरा लाख लोक व स्त्रीपैकीं मूठभर ब्रिटिश अधिकारी आणि व्यापारी सोडले तर साडेआठ लाख चिनी आहेत. मलायी फक्त अडीच लाख. सकाळीं बोटींतून उतरल्यापासून आतां दुपार होईपर्यंत सोनाळकरांच्या बँकेंत पाहिलेल्या मलायी शिपायाखेरीज मला तरी रस्त्यांत, दुकानांत किंवा बागेंत कुणी मलायी स्त्री किंवा पुरुष दिसला नाहीं. फेरीवाले चिनी, कापड दुकानांत चिनी, हॉटेलांत चिनी, बागेंत चिनी. माहीत नसतं तर आपण चिनी शहरांतच आहोंत असें वाटलें असतं ! तसेंच मलायाच्या पन्नाससाठ लाख लोकांत चाळीस टक्के चिनी, पंधरा टक्के हिंदी आणि पंचेचाळीस टक्केच मलायी आहेत म्हणे. त्यामुळें मुंबई–महाराष्ट्राच्या उलट सिंगापूर–मलायाचें भांडें आहे. मुंबईसाठीं महाराष्ट्र जीव टाकतो तर सिंगापूर घ्या घ्या म्हणणारांना मलायी पुढारी ' नको, नको, मुळींच नको ' म्हणत आहेत. सिंगापूरचे साडे आठ लाख चिनी आणखीं मलायांत मिळाले तर आपण अगदींच अल्पसंख्यांक होऊं अशी भीति मलायी लोकांना वाटते !

(अपूर्ण)



---

( पान ४५ वरून चालू )

सुरू झाली. या दरम्यान राणाला भेटण्यासाठीं बाहेरचा कुणींतरी इसम येईल असा माझा अंदाज होता. कारण केस लढवण्याइतकें पैसे राणापाशीं नव्हते. त्यामुळें मी पोलीसांना वरळी सबजेल आणि गिरगांव कोर्टावर नजर ठेवण्याची सूचना दिली.

७ मार्चला राणानें कोर्टांत गुन्हा नाकबूल केला. आणि केसची तारीख १० मार्चपर्यंत पुढें ढकलली. या तीन दिवसांत राणाला भेटायला कुणीच आलं नाहीं. पण १० मार्चला एक वकील त्याला भेटायला आला. या वकीलाला वकीलपत्र दिलं कुणी आणि त्याला कुणि पैसे दिले याचंच आम्हांला आश्चर्य वाटलं. ११ मार्चला कोर्टांत सिखरचंद जैन नांवाचा एक माणूस राणाशीं बोलतांना आढळला. तो कोर्टांतून बाहेर पडतांक्षणीं आम्ही त्याला गांठलें. हा सिखरचंद राणाबरोबर पूर्वी तुरुंगांत होता आणि त्याला २॥ वर्षं सक्तमजुरीची शिक्षा झाली होती. ह्या इसमाचा दादीशेठ अग्यारी लेनमध्यें एक रमी क्लब होता. आपण वकीलाच्या सूचनेमुळें राणाला भेटायला आलों होतों असेंहि त्यानें सांगितलें. मात्र राणाच्या या गुन्ह्याशीं आपला कांहींहि संबंध नाहीं असें त्यानें भासविलें.

अर्थात सिखरचंदच्या या बनावावर माझा मुळींच विश्वास बसला नाहीं. त्याच्या रमी क्लबची मी चौकशी केली तर असें आढळलें कीं या रमी क्लबची सर्व व्यवस्था आणि नोकरवर्ग १५ जानेवारीलाच बदलला आहे.

याच १५ तारखेस प्रिन्स राणा सकाळीं १०--३० वाजतां ॲस्टोरिया हॉटेलमध्यें २०३ नंबरच्या खोलींत उतरला होता. राणानें १३ तारखेला पुणें सोडले. म्हणजे १३ आणि १४ तारखेस तो कोठें होता ?

हेंच तर न उलगडलेले रहस्य होतें. तो क्लबमध्यें होता काय ? पण १५ तारखेस क्लबमधील सर्व जुने नोकर जाऊन त्या जागीं नवे नोकर आले होते. त्यामुळें हा पत्ता कसा लागायचा ?

अखेर मला बातमी लागली कीं, या क्लबमधील एक जुना आचारी, आतां भांगवाडी थिएटरमध्यें काम करतोय ! मी त्याची गांठ घेतली. त्याला एक फोटोचा जुडगा दाखवला. त्यानें त्यांतून नेमका प्रिन्स राणाचा फोटो ओळखून काढला. १३ जानेवारीला सकाळीं एक टॅक्सींतून प्रिन्स राणा सिखरचंदच्या क्लबमध्यें आल्याचें त्याला पक्कें आठवलें. प्रिन्स राणा १५ तारखेपर्यंत या क्लबमध्यें राहिला होता असेंहि त्यानें सांगितलें. आणखी बारकाईनें खोदून खोदून त्याला विचारल्यावर त्यानें कबूल केलें कीं, क्लबमध्यें झव्हेरी बजार मधील खुशालदास जव्हेरी येऊन गेला. यावेळीं प्रिन्स राणानें आपण कस्टम अधिकारी असल्याची बतावणी करून कांहीं माल त्याला विकला असेंहि सांगितलें.

यां माहितीच्या आधारावर आम्हीं खुशालदास जव्हेरीला गाठला. सिखरचंदच्या क्लबमध्यें आपण १३ तारखेला येऊन गेलों आणि तेथें मिळालेले जडजवाहिर पूर्णपणें मोडल्याचें त्यानें कबूल केलें. या दागिन्यांतील हिरे, मोतीं, वगैरे सुटे भाग आपण डाह्यालाल पुनमचंद व इतर जवाहिऱ्यांना २ हजार

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ऑगस्ट महिना हा अनेक दृष्टींनीं प्रबोधनाचा तसाच क्रांतीचा महिना. लोकमान्यांचा जन्म, महात्म्याचा अमर संदेश, स्वातंत्र्यदिन आदि महत्वाचे चेतनाप्रवाही असे दिवस ऑगस्टांतच स. आहेत. म्हणूनच —



**दीपावलीचा**

**ऑगस्ट महिन्याचा अंक हा**

**" अभिनव महाराष्ट्र विशेषांक "**

१ ऑगस्टला प्रसिद्ध होईल.

या अंकांत —

• **वि. स. खांडेकर** • **न. र. फाटक** • **पु. ल. गाडगीळ** • **अनंत काणेकर** • **स. आ. जोगळेकर** • **रा. म. आठवले** आदि विद्वान महाराष्ट्राच्या गेल्या दोन तपांतील सांस्कृतिक — सामाजिक आणि राजकीय प्रगतीचा आढावा घेतील.

या शिवाय

• **मं. वि. राजाध्यक्ष** • **दत्तू बांदेकर** यांचे तुफान विनोदी लेख.

• **ग. दि. माडगूळकर** • **अरविंद गोखले** • **पु. भा. भावे** आदि लेखकांच्या उत्कृष्ट कथा.

• **वा. भ. बोरकर** • **कुसुमाग्रज** • **मंगेश पाडगांवकर** आदि कवींच्या हृदयंगम कविता.

• **वेगळे पण सप्तरंगी मुखपृष्ठ** • हास्य चित्रें • व्यंगचित्रें. • चित्रेंच चित्रें.

**किंमत १। रु.**

रुपयांना विकल्याचें त्यानें कबूल केलें. त्यानें आम्हांला डाह्यालालचें जव्हेरी बाजारांतील दुकानहि दाखविलें. त्यावेळीं डाह्याभाई नवसारीला गेलेला होता. त्यामुळें मी लागलीच पोलीस कॉन्स्टेबल बगारामला बरोबर घेऊन नवसारीला १७ मार्चला गेलों. तेथें डाह्यालाल पूनमचंदची हिरे कापण्याची फॅक्टरी आहे. त्यानें खुशालचंदकडून आपण मोठे हिरे खरेदी केल्याचें कबूल केलें. चारपांच दिवसांत मी डाह्याभाईकडून लहानमोठे ४८ हिरे हस्तगत केले.

पण खुशालचंद किंवा डाह्यालाल यापैकीं कोणीहि उरलेली सिगारेट केस, सिगारेट लायटर, मोत्याचीं कुडीं सोन्याची कुडीं हिऱ्याची कुडीं या दागिन्याबाबत कांहीं सांगूं शकले नाहींत.

हा सर्व तपास कोर्टांत खटला चालू असतांनाच भरण्यांत आला. या सर्वांना साक्षीदार म्हणून कोर्टात उभें करण्यांत आले. सत्यकथा बाहेर येईपर्यंत त्याची कसून उलट तपासणी घेण्यात आली.

या प्रमाणें आम्हीं प्रिन्स राणा या ख्यातनाम घरफोड्याच्या ४ जानेवारी १९५८ ते १६ जानेवारी १९५८ पर्यंतच्या काळांतील हालचालीचें चित्र टिपूं शकलों. ४ जानेवारीलाच त्याची तुरुंगांतून सुटका झाली होती. आणि लागलीच त्यानें आपल्या 'कामाला' आरंभ केला होता. आम्ही केस जिंकली आणि राणाला २ वर्षे सक्तमजुरी आणि ५०० रु. दंड. व दंड न भरल्यास तीन महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली. ७०० रु. रोख आणि दागदागिने सौ. मुर्डींना परत करण्यांत आले.

या घरफोड्याला पूर्वी २० वेळां शिक्षा झाल्या होत्या हे विशेष.

• •

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




## साहित्य



### नझरुल् इस्लाम

२५ मेला बंगालचे थोर कवि नझरुल् इस्लाम यांचा साठावा वाढदिवस सर्वत्र मोठ्या उत्साहांत साजरा झाला. १८९९ सालीं बरद्वान जिल्ह्यांतील एक भणंग खेड्यांत जन्मलेला हा कवि कालांतरानें बंगालच्या आम जनतेचा आवडता कवि झाला. नलिनीकांत सरकारनीं एकदां लिहिलें, " १८९९ सालचा नझरुल्चा जन्म म्हणजे १९ व्या शतकाची २० व्या शतकाला मिळालेली थोर भेट. "

पूर्वायुष्यांत नझरुलनें असंख्य उद्योग केले. शेवटीं पहिल्या महायुद्धाच्या काळांत तो सैन्यांत दाखल झाला. पण रणक्षेत्राच्या भीषण धुमाळींतहि नझरुल्चें प्रतिभासाधन चालूच होतें. त्याचा परिपाक म्हणजे महायुद्धाहून परत आल्यावर १९२० सालीं त्यानें आपला पहिला काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. 'विद्रोही'चें हें प्रकाशन म्हणजे बंगाली कवितेच्या इतिहासांतील एक क्रांतिकारक क्षण. त्यापूर्वीची बंगाली कविता म्हणजे तरल भावनात्मक आणि स्वप्नरंजनात्मक. ध्येयाची आणि आदर्शाची पताका आपल्या काव्यांत फडकावण्याचें महान् कार्य नझरुल्नेंच प्रथम केलें. त्याचा मानवतावाद, अन्यायाबद्दलची तीव्र चीड, पतितांबद्दलची असीम सहानुभूति यामुळें नझरुल्चें काव्य बंगालच्या सर्व सामान्य जनतेंतहि लोकप्रिय झालें. 'नझरुल्' हा उद्यांचा महाकवि आहे ही घोषणा रविंद्रनाथ टागोरांनीं केली आणि आपलें 'वसंत' हें नाटक नझरुल्ला अर्पण केलें. नझरुल्नें 'धूमकेतू' नांवाचें एक मासिक काढलें होतें. या मासिकांतहि त्याच्याविषयीं गौरवपूर्ण कविता लिहून रविंद्रनाथांनीं आपली गुणग्राहकता व्यक्त केली.

धूमकेतूचें संपादन करीत असतांना त्यांतील आक्षेपार्ह लिखाणामुळें नझरुल्ला राजद्रोहाच्या आरोपावरून तुरुंगवासाची शिक्षा झाली. या काळांत त्यानें ४२ दिवसाचा उपासहि केला.

१९२४ सालीं नझरुल्नें विवाह केला. २५ सालीं त्यानें नांगर नांवाचें साप्ताहिक काढलें. याचेंच पुढें नामांतर 'जनवाणी' असें झालें. वृत्तपत्रीय व्यवसायांत नझरुल्ला आर्थिक अपयशाखेरीज कसलीच प्राप्ति झाली नाहीं. पण त्याच्या काव्यानें त्याला हात दिला. नझरुल्चे सर्व काव्य गेय असल्यामुळें त्याला ध्वनिमुद्रिकांच्या बाजारांत फार लोकप्रियता मिळाली. त्याच्या एकूण ३००० कविता ध्वनिमुद्रित झाल्या. वैयक्तिक गीतांच्या ध्वनिमुद्रणाच्या बाबतींतला हा उच्चांक असावा.

### श्रीपाद कृष्ण

जून महिन्यांत महाराष्ट्राचे श्रेष्ठ विनोदी लेखक, नाटककार आणि समीक्षक कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचा स्मृतिदिन सर्वत्र आदरानें साजरा करण्यांत आला. नव्या पिढीसमोर श्रीपाद कृष्णाची नाटकें नाहींत तथापि मराठी नाट्यवाङ्मयाच्या इतिहासांत श्रीपाद कृष्णांची कामगिरी महत्त्वाची आहे. कै. देवलांच्या मागोमाग श्रीपाद कृष्णांनीं नाट्यवाङ्मयांत पदार्पण केलें. मतिविकार (१९०६) ते जन्मरहस्य (१९१९) पर्यंतची त्यांची सर्व नाटकें तत्कालीन सुधारणावादावर अधिष्ठित असली तरी स्वतंत्र चमत्कृतिपूर्ण कथानक, नव्या मोहक चाली, आणि शाब्दिक विनोद या श्रीपाद कृष्णांच्या वैशिष्ट्यांचा पुढील पिढींतील गडकऱ्यांसारख्या श्रेष्ठ नाटककारांवरहि परिणाम झाला. कृत्रिम प्रसंग, रसहीन संवाद आणि उत्कटताशून्य वातावरण यामुळें कोल्हटकरांची नाटकें रंगभूमीवर जिवंत राहूं शकली नाहींत. पण कोल्हटकरांचें खरें सामर्थ्य त्यांच्या नाट्य लेखनापेक्षां त्यांच्या विनोदी लिखाणांतच होते. सामाजिक व्यंगाचा इतका तीव्र आणि विनोदपूर्ण उपहास अजून तरी मराठी वाङ्मयांत अपूर्वच आहे. त्यांचे 'सुदाम्याचे पोहे' हें पुस्तक म्हणजे मराठी वाङ्मयाचें एक भूषणच. सुदाम, पांडुतात्या आणि बंडूनाना ही व्यक्तिचित्रें मराठींत चिरंजीव झालेली आहेत. कोल्हटकरांच्या वाङ्मयाच्या पसाऱ्याप्रमाणें त्याच्या शिष्यांचा पसाराहि बराच मोठा आहे. त्यांतील कित्येक पुढें गुरुच्या पावलावर पाऊल टाकून मराठी वाङ्मयांत ख्याति मिळविते झाले.

मराठी भाषा आणि मराठी भाषिक श्रीपाद कृष्णाचे फार ऋणी आहेत हें मात्र निर्विवाद.

— पिनाकि



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## राजकारण

### राजाजींची पीछेहाट

कॉंग्रेसच्या राजकारणांतील एक माजी धुरंधर, भारताचे माजी गव्हर्नर जनरल आणि महात्मागांधींचे व्याहि, या अनेक नात्यांनी सुपरिचित असलेल्या चक्रवर्ति राजगोपालचारींनीं भारतीय राजकारणांत पं. नेहरूंच्या विरुद्ध एक नवी आघाडी निर्माण केली आहे. गेलीं कांहीं वर्षे राजाजींची सर्व वक्तव्यें आणि कृति अखंडपणें नेहरूविरोधी होती. भाषिक प्रश्नाबाबत तर त्यांनीं फार तीव्र विरोधी भूमिका घेतली होती. मिनू मसानी आणि व्ही. पी. मेनन या दोन कर्तृत्ववान पण आज मागें पडलेल्या व्यक्तींच्या कचाट्यांत राजाजी सांपडले आणि त्यांनीं 'स्वतंत्र पक्षाची' स्थापना केली आहे. देशांत या स्वतंत्र पक्षाबाबत निरनिराळ्या पक्षांत फार भिन्न भिन्न प्रतिक्रिया झाल्या. हा पक्ष प्रतिगामी स्वरूपाचा आहे, कॉंग्रेसला प्रगतिकारक उपाययोजना अंमलांत आणण्याबाबत विरोध करण्याखेरीज या पक्षाकडून कांहींच कार्य होणार नाहीं असें उद्गार कम्युनिस्ट पक्षाचे श्री. अजय घोष यांनी काढले. ढेबरभाई म्हणाले "असले पक्ष काढून कांहीं राष्ट्राचे प्रश्न सुटत नसतात." या पक्षाच्या स्थापनेनें भांडवलदार वर्गातील बऱ्याच व्यक्ति आतां कांहीं तरी किमया होणार अशा कल्पनेनें हर्षभरित झाल्या आहेत. विर्लांचा 'इस्टर्न एकानामिस्ट' म्हणतो. "It is greatly relieving to note from the addresses of both Mr. C. Rajgopalchari and Mr. M. R. Masani... that "a grand coalition of the free peasantry self employed artisans. and traders, middle class intelligenzia professional and business–is under active contemplation."

मद्रासमधील एका शाकाहारी हॉटेलांत या पक्षाची मुहूर्तमेढ झाली. त्याला ःवघे ३० इसम उपस्थित होते. या तीस जणांनीं पक्षाचा पुढीलप्रमाणें कार्यक्रम आणि धोरण आंखलें आहे.

तिसऱ्या योजनेला विरोध, सहकारी चळवळीला विरोध, वैयक्तिक मालकी हक्काच्या शेती पद्धतीला पाठिंबा, अशा प्रतिगामी स्वरुपाच्या ध्येयावर या तीस जणांनीं शिक्का मोर्तब केलें.

राजाजींची ही राजकीय पीछेहाट म्हणजे भारतीय राजकारणांतील एक दैवदुर्विलासच !


आमचा 'स्वतंत्रपक्ष' कॉंग्रेसवर नजर ठेवील.

### स्वतंत्र सिंगापूर

जून महिन्याच्या तीन तारखेस सिंगापूर स्वतंत्र राज्य झालें आणि ४० वर्षांच्या वसाहतवादाचा शेवट झाला. स्वातंत्र्याच्या दृष्टीनें आशिया खंडानें टाकलेलें आणखी एक पुढचें पाऊल. पस्तीशीच्या वयाच्या ली कुआनच्या नेतृत्वाखालील जनतेच्या कृति समितीच्या नऊ सदस्यांच्या मंत्रिमंडळानें ब्रिटनपासून अधिकारसूत्रें ग्रहण केली आणि सिंगापूरची नवी राज्यघटना अस्तित्वांत आली. अर्थात् ली कुआनच्या नेतृत्वाखालीं अस्तित्वांत येणाऱ्या स्वतंत्र सिंगापूरची कल्पना सिंगापूरच्या जनतेला फारशी पसंत नव्हती. याचें कारण नव्या घटनेनें संरक्षण आणि परराष्ट्रीय संबंध ब्रिटिश सरकारच्या हातीं राखून ठेवण्यांत आले आहेत. या शिवाय सिंगापूरमधील नाविक आणि हवाई तळ यांची व्यवस्था ब्रिटनकडेच राहाणार आहे. अन्तर्गत सुरक्षितता मात्र सात सदस्यांच्या एका समितीकडे सोंपवण्यांत आली असून या समितींत तीन सभासद ब्रिटनचे तीन सिंगापूर सरकारचे आणि एक मलाया फेडरेशनचा राहील. याचा अर्थ असा कीं सिंगापूरच्या अन्तर्गत सुरक्षिततेच्या प्रश्नाबाबत मलाया फेडरेशन सरकारला बराच हस्तक्षेप करतां येईल. मलाया सरकारांतील उजव्या गटाला विरोधी अशा सभासदांचे बहुमत आणि आजच्या सिंगापूर सरकारांतील उजव्या गटाचें असणारें प्राबल्य लक्षांत घेतां या दोघांचें वारंवार मतभेद निर्माण होऊन अन्तर्गत सुरक्षिततेबाबत ब्रिटनचें सार्वभौमत्व कायम राहाणार यांत शंकाच नाहीं.

या उणीवा असूनहि सिंगापूरच्या जीवनांतील हें नवें पर्व अत्यंत आशादायक आहे हें निर्विवाद. 'पीपल्स ॲक्शन पार्टी' ही संघटना कम्युनिस्टांच्या हातचें बाहुलें व्हायला तयार नाहीं अशी घोषणा पंतप्रधान ली कुआन यांनीं केली. मात्र मागील सरकारनें ज्या तऱ्हेनें 'शुद्धीकरण' चालवलें होतें त्याप्रमाणें आम्ही न वागतां कम्युनिस्टांशीं लोकशाही पद्धतीनेंच लढा देणार आहोंत. असेंहि त्यांनीं सांगितलें. अर्थात् त्यांचे शत्रू स्वस्थ बसलेले नाहींत. व अशा वातावरणांत नवें सरकार कसा काय राज्यकारभार करते याकडे सिंगापूरवासियांचे डोळे लागले असणार हें साहजिकच.

### केरळांतील निर्वाणीचा लढा

"लोकशाहीच्या मार्गाखेरीज एखादें सरकार पदच्युत होणें मी अपेक्षित नाहीं." असे उद्गार पं. नेहरूनीं वार्ताहरांना दिलेल्या मुलाखतींत काढले असले, अगर कॉंग्रेस अध्यक्ष इंदिरा गांधी यांनीं कॉंग्रेस जनांना जातीय संघटनांच्या विनाशक चळवळी पासून दूर राहाण्याचा आदेश दिला असला तरी त्यामुळें केरळांत चाललेल्या घडामोडींची तीव्रता यत्किंचितहि कमी होत नाहीं. केरळच्या आंदोलनांतील मुक्तिदिनाची , भाषा ब्रिटिश सरकार हिंदुस्तानांतून आपला गाशा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

गुंडाळण्याच्या तयारींत असतांना मुस्लीम लीगनें वापरलीं. मुस्लीम लीगच्या आदेशाचें फारच थोड्या मुसलमानांनी उत्साहपूर्ण स्वागत केलें तरी सुरावर्दींच्या पंतप्रधानकीच्या कारकीर्दींतील कलकत्ता शहरांत रक्ताचे पाट वाहले गेले अशी इतिहासाची साक्ष आहे.

केरळांत तसें कांहीं घडेल कीं काय याची चिंता वाटते. १६ जूनला पोलिसांनीं गोळीबार केला त्याचें समर्थन केरळ सरकारनेंहि केलें आहे आणि त्याचा निषेध विरोधकांनीं केला आहे. या प्रकरणांत कॅांग्रेसनें नायर सर्विस लीग सारख्या जातीय संघटनेशीं हातमिळवणी केली ही घटनाहि कॅांग्रेसला भूषणावह नाहीं. नायर सर्विस सोसायटीचे प्रमुख नेते मन्नाथ पद्मनाभन यांनी आपलीं हयात कॅथॉलिकांशी झगडण्यांत घालवली. तेच गृहस्थ आतां कम्युनिस्टांच्या विरुद्ध कॅथॉलीकांशी



" नेहरू चचा मुझे बचाओ—"

एकजूट करते झाले हीहि आश्चर्यजनक घटना. या प्रकरणाबाबत कम्युनिस्ट खासदार कॉ. ए. के. गोपालन् यांनीं आपल्या पत्रकांत असा इशारा दिला कीं केरळमधील चळवळ चालू ठेवण्यांत आली तर यापुढें कोणत्याहि राज्यांत कॅांग्रेस सरकारला सुरळीतपणें कारभार चालवितां येणार नाहीं.

केरळमध्यें कम्युनिस्टांच्या आदेशाप्रमाणें देशभर शिक्षण बिलाला पाठिंबा देण्यासाठीं सर्वत्र सभा घेण्यांत येत आहेत. ट्रेड युनियन संघटनांनीं कामगारांना हरताळापासून अलग राहाण्याचा आदेश दिला. आणि हें सारें आंदोलनात्मक वातावरण असतांना कम्युनिस्ट मंत्रिमंडळानें आपलें 'ॲग्रेरियन रिलेशन्स बिल' ३६ दिवसांच्या चर्चेनंतर पास करून घेतलें. आणि ज्या कॅांग्रेस, समाजवादी आणि इतर पक्षांनीं कम्युनिस्ट सरकारला उलथून पाडण्याचा विडा उचलला आहे त्याच विरोधी पक्षीयांनीं या शेतकी बिलाला आपलें पूर्ण सहकार्य देण्याचें आश्वासन दिलें.

मात्र केरळच्या शिक्षणविषयक बिलाबाबतच्या कांहीं विशिष्ट गटांतील असंतोषाचा फायदा घेऊन विरोधी पक्षीयांनीं जो लढा चालविला आहे, त्याबाबत भिन्न भिन्न प्रतिक्रिया आढळतात. 'स्वराज्य' साप्ताहिकाच्या एका अंकांत 'केरळ सत्याग्रह' या मथळ्याखालीं लिहिलेल्या अग्रलेखांत श्री. राजाजी म्हणतात. "एखाद्या गाऱ्हाण्याच्या बाबतींत दाद लावून घेण्याचा कायदेशीर मार्ग मोकळा असतांना सत्याग्रहाचा अवलंबन करणें या विचाराचा म. गांधींच्या मनांत केव्हांहि थारा मिळाला नाहीं. मतदारांनीं एखाद्या मुदतीसाठीं अमुक एक पक्ष राज्यांत अधिकारावर असावा असा निर्णय दिलेला असतांना तो निर्णय फिरविला जावा यासाठीं सत्याग्रह करणें हें तर अधिकच असमर्थनीय आहे."

राजाजींच्या निवेदनांच्या उलट केरळांत आणीबाणीची परिस्थिति जाहीर करण्यांत केंद्रसरकारनें हेळसांड केली तर सबंध सनदशीर राज्यव्यवस्था धोक्यांत येईल असा इशारा श्री. कन्हयालाल मुन्शी यांनी दिला आहे.

या भिन्न प्रतिक्रियांचें सार एकच तें म्हणजे केरळांत अशांतता आहे. या अशांततेला निश्चित जबाबदार कोण—कॅांग्रेस कीं कम्युनिस्ट मंत्रिमंडळ याचें उत्तर लवकर मिळणें कठिण आहे. त्यासाठीं कांहीं काळ वाट पाहावी लागेल. अर्थात् पुढील निवडणुकांत मतदार काय तें खरें उत्तर देतील तें निश्चित. मात्र हें उत्तर आपल्या बाजूनेंच मिळेल असा कम्युनिस्टांचा दावा आहे.

— विष्णुशर्मा.

## देशकारण

### संस्कृतचें पुनरुज्जीवन

कालडी येथें भरलेल्या अखिल भारतीय संस्कृत संमेलनानें संस्कृत भाषा ही अधिकृत सरकारी भाषा म्हणून सरकारनें जाहीर करावी असा ठराव संमत केला आहे. हिंदी आणि इंग्रजीच्या वादावादींत संस्कृतलाच राजभाषेचें स्थान द्यावें असा या संमेलनांत युक्तिवाद करण्यांत आला. सरकारनें हा ठराव अंमलांत आणीपर्यंतच्या काळांत भारतीय नभोवाणीवरून सर्वत्र संस्कृत शिक्षेचे पाठ सुरूं करावे अशीहि सूचना करण्यांत आली.

संस्कृतच्या अभिमान्यांचा या मृत भाषेला राष्ट्रभाषेच्या पदावर अधिष्ठित करण्याचा मनसुबा वेडेपणाचा आहे. गेल्याच महिन्यांत केंब्रिज विद्यापिठाच्या रिजंट हाऊस या मतदान समितीनें विद्यापीठांत प्रवेश मिळविण्यासाठीं लॅटिन भाषेची सक्तीची अट मागें घेण्याचा निर्णय घेतला. केंब्रिजच्या मागोमाग ऑक्सफर्ड विद्यापीठहि लॅटिनची ही सक्ति काढून टाकण्याच्या विचारांत आहे. संस्कृत भाषाभिमान्यांस केंब्रिज विद्यापीठाचा हा निर्णय एक प्रकारें उत्तर असलें तरी देशांतील संस्कृताभिमानी स्वस्थ बसलेले नाहींत. संस्कृतच्यां विकासासाठीं मध्यवर्ति शिक्षणखात्यानें एक मध्यवर्ति समिती नेमण्याचा मनोदय जाहीर केला आहे.

आज जिथें देशी भाषांची अनावस्था आहे अशा परिस्थितींत केवळ ग्रंथांतर्गत अशा या मृत भाषेच्या उद्धाराचे प्रयत्न कांहीं विशिष्ट मर्यादेपर्यंतच स्वागतार्ह आहे. यापेक्षां राष्ट्रीय जीवनांत असल्या चळवळीचे महत्त्व केव्हांहि दुय्यम राहील.

— नचिकेत

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## क्रीडा

### खेळ खरा–पण नशिबाचा !

कुठलाहि खेळ म्हटला कीं नशीब आलेंच. नशिबाशिवाय खेळ नाहीं आणि खेळाशिवाय नशीब नाहीं. क्रिकेट हा सगळ्या खेळांचा राजा, त्यामुळें नशिबाचें प्रस्थहि त्यांत मोठें. ब्रिस्बेनवर पहिल्याच डावांत सहाशें धांवा काढून हटणारे ऑस्ट्रेलियन पुढें स्टॅथम–टामसनपुढें प्रत्येक डावांत दोनशें धावांनाहि महाग होतात, जगांतल्या सगळ्या श्रेष्ठ खेळाडूंच्या संघालाहि पाणी पाजण्याची आशा करणारे इंग्लिश लोक ऑस्ट्रेलियाकडून चारदां मार खातात आणि एकादा टेफील्ड किंवा रामाधिन इंग्लंड किंवा ऑस्ट्रेलिया यांच्यांत भेदभाव करतां त्यांच्या फलंदाजीचा डोलारा भुईसपाट करतो—हा सगळा नशिबाचा खेळ आहे.

पण नशिबा-नशिबांत सुद्धां फरक असतो. आतां आपला भारतीय क्रिकेट संघ (संघ?–छे चमू !) तो काय, आणि त्याचें नशीब तें काय ! जिथें जाईल तिथें मार खाऊन फजितीनें काळवंडलेलें तोंड घेऊन रडत येणारें शेंबडें पोर !...

ग्लॅमॉर्गननें मारलें, एम्. सी. सी. नें ठोकलें, कसोटींत तर फज्जाच उडाला—आणि कळस म्हणजे मायनर काउंटीजनीं अब्रूचीं सालडीं काढलीं ! चिडलेल्या इंग्लिश लेखणीबहाद्दरांनीं त्यांना सरळ-सरळ घालवून देण्याची भाषा काढली. इकडे त्यांचे कित्येक देशबांधव त्रस्त झालें परत या म्हणूं लागले ! आतां त्या बिनूला बोलवा म्हणून कींव करण्यांत आली !—आणि ज्यांनीं आपल्या सहानुभूतीचा साठा पुरवून पुरवून ठेवला होता, त्यांनींसुद्धां नॉटिंगहॅमला ह्या 'दिव्य' चमूपुढें हात टेकले !

या आरडाओरडींत 'क्रिकेट हा नशिबाचा खेळ आहे' हें सगळे विसरून गेले. लॉर्ड्सवर आमच्या कांहीं पोरांत एकाएकीं काय भूत संचारलें कोण जाणें, त्यांनीं इंग्लंडच्या बलशाली फलंदाजीला खेळणेंच मुष्किल करून टाकलें. 'शंभराला सात' हा आकडा ऐकून सगळें इंग्लंड हादरलें, नजरा चमकल्या, वाटा बदलल्या, 'टेरिबल-हॉरिबल' करीत लोक स्टेडियमवर धावत आले—लेखणीचा सूर बदलला—दृष्टि एकदम निवळली—"क्रिकेट इज अ गेम ऑफ चान्स" हें भारताच्या चमूनें सिद्ध करायचें ? आणि हीं पोरें आहेत, आणि तीं शिकाऊ आहेत ही गोष्ट खरी वाटूं लागली ! पण लॉर्ड्सवर झालेल्या या चमत्काराचें खरें कारण वेगळें आहे. रात्रंदिवस घरींदारीं–वर्तमानपत्रीं चाललेल्या टिंगलीला कंटाळून या चमूंतलीं कांहीं पोरें चिडलीं—आणि माणूस चिडून पेटला म्हणजे जें काय होतें तें त्यांनीं दाखवलें. चिडून पेटणें हें तरुण रक्ताचें लक्षण आहे. सुरेंद्रनाथ आणि रमाकांत देसाई हे तरुण आहेत—देसाई तर एकोणीस वर्षांचा कोवळा पोरगा आहे—आणि इंग्लंडला एवढा मोठा धक्का याच दोघांनीं दिला आहे. आतां असा विचार करा, कीं या दोघांत संचारलेली वीज बाकीच्या तरुणांत शिरली, आणि तेहि पेटले तर ! ईर्षा ही काय करील याचा नेम नसतो.

देसाई, सुरेंद्रनाथ, बोर्डे, घोरपडे, कॉँट्रॅक्टर, नाडकर्णी, यांची तडफ एकत्र आली तर ? आणि समजा, उम्रीगर, मांजरेकर, रॉय, गुप्ते, यांचें मध्येंच गचकणारें कसब ऐन वेळीं कामी आलें तर ?...हें सगळें झालें तर ? इंग्लंडचा पराभव ?—आणि समजा, तोहि झाला तर !

असें कांहीं अघटित झालें तर इंग्लिश टीकाकारांचें काय होईल ? ज्यांना काउंटीच्याहि खालीं नेऊन ठेवलें, न्यूझीलंड पेक्षांहि खालचे आणि चार दिवसांचेहि सामने खेळायला नालायक ठरवावें—ज्यांना हाकलून द्यायला काढलें त्याच 'फडतूस पोरां' कडून मार खाण्याची पाळी आली, तर इंग्लिश क्रिकेट टीकाकारांचें काय होईल ? लॉर्ड्सवर एवढीशी चुणुक दिसल्याबरोबर मिलरसारखे लोक शब्द मागें घ्यायला लागले, नॉटिंगहॅमच्या चार दिवसांत दिसले नाहींत एवढे प्रेक्षक लॉर्ड्सवर एका तिसऱ्या दिवशीं दिसले, इतकेंच नव्हे तर भारतीयांनीं विजय हातचा घालवला इथवरहि कांहीं लोकांची जीभ लांब झाली, मग खरोखरच तसें कांहीं आमच्या 'पोरां' नीं केलें तर यांचें काय होईल ?...

— पी. गोलंदाज

मडगांवचें भूषण —

## कु. सुरेंद्र श्रीधर नायक



यंदाच्या एस. एस. सी. परिक्षेंत जवळ जवळ सव्वालाख विद्यार्थ्यांतून कुमार सुरेंद्र यानें दहावा क्रमांक पटकावून गोमंतकांतील मडगांव या शहराला बहुमानीत करून ठेवलेलें आहे.

वयाच्या सोळाव्या वर्षीं मिळवलेल्या या अपूर्व यशाबद्दल आम्ही त्याचें अभिनंदन करतों.

---

(पान ५७ वरून चालू)

हें पटवून देणाऱ्या 'वाटमार,' 'ऋण,' 'माझ्या लग्नाची गोष्ट' या कांहीं प्रतिबिंबी पण यशस्वी कथा !

—परंतु जेव्हां मधूनच लेखक स्वत: दिसतो तेव्हां तो प्रतिबिंबी लेखकाला चीत करतो. उदाहरणादाखल 'दूरचे डोंगर,' 'वाटमार,' 'कांचनमृग' हीं शीर्षकें आणि 'जुगार,' 'जाहला सोहळा अनुपम्य' या कथांच्या कल्पना.

तेरा कथांपैकीं 'महिना अखेर,' 'माझ्या लग्नाची गोष्ट,' 'पांढऱ्यावर काळें,' 'जाग,' आणि 'वाटमार' या (गुणानुक्रमें) पांच यशस्वी कथा. इतक्या यशस्वी कथांच्या, आकर्षक शीर्षकांच्या, चांगल्या कल्पनांच्या एकंदर गुणांची बेरीज लेखकाचें मन:पूर्वक अभिनंदन करण्याइतकी नक्कीच आहे !!

—श. ना. नवरे

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




## सुखी जीवन
— बाळ सामंत

## शीर्षकांचा शुक्रपक्ष
— शं. ना. नवरे

सुखी जीवन

### वैशाख

वैशाख ही माधव कानिटकर यांची पहिलीच कादंबरी. कानिटकर हे कथालेखकहि आहेत आणि या कादंबरीनें त्यांनीं कादंबरीच्या प्रांगणांत पदार्पण केलें आहे. पण वैशाख वाचून संपवतांच कानिटकरानीं कादंबरी लेखनाची एवढी घाई करायला नको होती असें वाटलें. कारण या कादंबरीवर— त्यांतील कथावस्तु, कथनशैली यावर फडक्यांच्या कादंबऱ्याची दाट छाया पडली आहे. असंभाव्य आणि कृत्रिम घटनांची या कादंबरींत रेलचेल आहे. कादंबरीच्या अखेरीस मधुचंद्राला निघालेल्या नायक नायिकेच्या आगगाडीस प्रचंड अपघात होतो—आणि या अपघातांत फक्त हे दोन सुखीजीवच बचावतात असें दाखवून लेखकानें आपल्या कल्पना शक्तीचा कळस गांठला आहे. यामुळें लेखकाची ओघवती लेखनशैली एका सामान्य कथानकांत आणि अतिसामान्य व्यक्तिचित्रणांत वांया गेली आहे. फावल्यावेळीं मनरंजन करण्यासाठीं वाचावयास हरकत नसलेली एक १५० पृष्ठांची दीर्घ कथा अगर लघुकादंबरी यापेक्षां कानिटकरांच्या या 'वैशाख' ला जास्त प्रशस्तीपत्रक देतां येत नाहीं. मुखपृष्ठावरील चित्र तितकेंच भयानक आहे.

— बाळ सामंत

शीर्षकांचा शुक्रपक्ष

### मनांतलें चांदणें

सध्यां कथासंग्रहांच्या 'शीर्षकांचा शुक्र पक्ष' चालू आहे. सदानंद रेगे यांचें 'चांदणें', अच्युत बर्वे यांचा 'चांदण्याचा सुगंध', दिनकर पाटील यांचें 'सूर्याचें चांदणें' आणि माडखोलकर यांचें 'शुक्राचें चांदणें'. या चांदण्यांत ( सध्यां तरी ) आणखी एकाची भर—वि. ग. कानिटकर यांचें 'मनांतलें चांदणें'!

या 'चांदण्यांत' तेरा कथा आहेत. चांदण्यांत स्पष्ट दिसण्याऐवजीं जसे भास होतात तसेच भास या कथांच्या बाबतींत होतात. बहुतेक कथांचा तोंडवळा आहे बोकील गाडगिळांच्या कथांसारखा. ( प्रस्तावनाकारांच्या मतें मोकाशींच्याहि कथांसारखा ) एका आंग्ल लेखकाच्या पद्धतींत मांडायचें तर चार चमचे गाडगीळ, दोन चमचे बोकील, अर्धा चमचा गोखले आणि स्वादापुरतेंच अच्युत बर्व्यांचें 'इसेन्स'. नटी आणि सामान्य जीवन जगणारा प्राणी ( हा बहुधा मास्तर वा कारकून ) यांनीं एकत्र येणें ही बोकिलांच्या ठेवणींतली चीज आणि बारकाव्यांनीं चित्रमयी कथा लिहिण्याचें गाडगीळांचें कसब यांचा लेखकाला विशेष मोह पडलेला दिसतो. 'ऋण' आणि 'कांचनमृग' वाचतांना बोकिलांची, 'वाटमार,' 'तह' 'खेळ' 'नाच' (आणि कथासंग्रहाचें नांवहि) वाचतांना गाडगीळांची हटकून आठवण होते तर 'दूरचे डोंगर' वाचतांना गोखल्यांच्या व 'हारजीत,' 'जाग,' माझ्या लग्नाची गोष्ट' वाचतांना बर्व्यांच्या कथांची अस्पष्टशी आठवण होते; कानिटकर 'प्रतिबिंबी' लेखक वाटूं लागतात. अर्थात्च वाटते इतकी ही बाब सोपी नाहीं

( पान ५६ वर पहा )

---

( पान ३८ वरून चालू )

कांहींतरी कुजबुजल्यासारखं करून त्या मुलीनं त्याला आंत यायला सांगितलं. अगदींच नाईलाज झाला तेव्हां त्यालाहि नाहीं म्हणतां येईना. कसंबसं अंग चोरून घेत तो आंत शिरला. तिच्या हातांतल्या फुलांचा झुपका त्याच्या पाठीच्या भाराखालीं चुरगाळून गेला. पण त्याचं तिला कांहीं वाटलं नाहीं. त्याच्या ओल्या अंगांतून येणाऱ्या घामाच्या वासानं ती दिङ्मूढ झाली. पण तिनं कांहीं बाजूला मान वळविली नाहीं. त्याच्या शरीराचा उबारा मिळाल्यावर तिचं थरथरणं हळूं हळूं कमी होऊं लागलं.

पावसाची टपटप आतां थांबली होती. तीं दोघं उभीं होतीं तिथं अधीक प्रकाश पडला होता. तीं बाहेर आलीं तेव्हां चक्क झगझगीत ऊन पडलं होतं.

वाटेंत त्यांना एक ओढा लागला. पण त्याचं पाणी इतकं गढूळलं होतं नि इतकं वर चढलं होतं कीं एखाद्या उडींत तो ओलांडणं शक्यच नव्हतं.

त्यानं आपली पाठ तिच्यायडे केली नि एक शब्दहि न बोलतां त्याच्या खांद्यावर बसून ओढा पार करण्यास ती तयार झाली. तिला घेऊन तो ओढ्याच्या मधोमध आला तेव्हां पाणी त्याच्या मांड्यांना लागूं लागलं. तिनं घाबरून किंकाळी मारली नि त्याच्या मानेला घट्ट विळखा घातला. तीं दोघं ओढा पार करून किनाऱ्यावर येईयेईस्तंवर आकाश इतकं स्वच्छ होऊन गेलं होतं कीं ढगाचा एखादा चुकार तुकडासुद्धां कुठं दिसत नव्हता.

\+ + + +

कितीतरी दिवस ती त्या बाजूला फिरकलीहि नाहीं. ती भेटेल म्हणून रोज तो ओढ्यावर जाऊन येत असे. पण एकदांहि ती त्याच्या दृष्टीस पडली नाहीं.

शाळेच्या पटांगणांत ती कुठं दिसते का हें पहाण्यासाठीं तो तिच्या शाळेच्या बाजूलाहि अनेक वेळां गेला होता. एकदां तर त्यानं न्‍ पांचवीच्या वर्गांतहि डोकावून पाहिलं. पण अंहं...ती कांहीं त्याला कुठं दिसली नाहीं.

एक दिवस तो तिनं भिरकावलेल्या पांढऱ्या गोटीशीं चाळा करीत ओढ्यावर आला तेव्हां ती कांठावर बसलेली त्याला दिसली.

"मी आजारी होत्यें." ती पांढरी फटफटींत पडली होती व अंगानंहि खूप वाळली होती.

"त्या दिवशीं पावसांत भिजलीस त्यामुळं ?"

मान हलवून ती 'हो' म्हणाली.

"आतां कसं आहे ?"

"अजून तितकंसं बरं नाहीं वाटत."

'मग इथं कशाला आलीस. घरीं पडून रहायचं नाहीं का ?"

"घरीं रहायचा मला अगदीं कंटाळा कंटाळा आला होता. म्हणून आज जरा बाहेर पडल्यें...त्या दिवशीं कशी गंमत झाली नाहीं ?..." बोलतां बोलतां आपल्या गुलाबी स्वेटरच्या पुढल्या बाजूला पडलेल्या डागाकडे तिनं नजर वळवली. अन् मग ती म्हणाली,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

" हा डाग कुठं नि कसला पडला आहे कळत नाहीं ! कांहीं केल्या मेला जायलाच कबूल नाहीं. "

तो डाग...गर्द तपकिरी रंगाचा...हळू हळू करडा होत चाललेला...त्या डागावरून नजर काढतांना तिचे गाल किंचित् लालसावले.

" हा डाग कुठं पडला आहे असं तुला वाटतं ? "

तो तिच्याकडे आ वासून पहात राहिला होता.

" हं...आतां आलं माझ्या लक्षांत. त्या दिवशीं तुझ्या पाठुंगळीला बसून नाहीं का मी ओढा ओलांडला ! तेव्हांच तुझ्या पाठीचा लागला असावा हा. "

त्याला वाटलं, आपल्या पायांतलं रक्त वरवर चढत आहे.

रस्त्याच्या बेचकापाशीं तीं आलीं तेव्हां आपल्या हातांतलीं जुजूबचीं फळं तिनं त्याला देऊं केलीं.

" आज काढलीं आमच्या घरीं. आतां चंद्रोत्सव जवळ येत चालला आहे ना ? "

तीं फळं घ्यावींत कीं न घ्यावींत हेंच त्याला कळेना. क्षणभर तो गोंधळल्यासारखा झाला.

" घे रे...थोडीं तरी घे ! खूप गोड आहेत हीं. माझ्या पणजोबांच्या वडलांनीं लावलेल्या झाडावरचीं आहेत हीं. "

तीं घेण्यासाठीं त्यानं आपल्या हाताची ओंजळ पुढें केली.

" किती टपोरीं आहेत हीं, नाहीं ? "

" तुला माहित आहे ? चंद्रोत्सव संपल्यानंतर आम्हीं आमचे घर भाड्यानं देणार आहोंत. "

यून कुटुंबाचा सेऊलमध्यें धंदा होता, पण तो पार बसल्यामुळें सेऊल सोडून त्यांना इथं कसं यावं लागलं होतं याविषयींची हकीकत गांवकऱ्यांच्या तोंडून त्यानं ऐकली होती. म्हणजे आतां त्यांना त्यांचं इथलंहि घर भाड्यानं द्यावं लागणार होतं तर !

" काय चाललं आहे मला कळत नाहीं. पण आतां वणवण करीत रहायचा मला अगदीं कंटाळा आला आहे. हें घर सोड, दुसऱ्या घरांत जा तें घर सोड तिसऱ्या घरांत जा असं किती दिवस चालायचं ? वडील माणसापुढं आपला इलाज चालत नाहीं म्हणून त्यांच्या बरोबर आपणहि वणवणत रहायचं एवढंच ! "

बोलतां बोलतां तिची नजर विषण्ण झाली. असली विलक्षण विषण्णता यापूर्वी त्याला तिच्या नजरेंत दिसली नव्हती.

तिला सोडून तो एकटाच घरीं परत आला तेव्हां तीच...तीच बातमी त्याच्या कानाभोंवतीं घोंगावत राहिली होती. तिनं दिलेलीं ज्यूजूबचीं फळं त्याला मुळींसुद्धां गोड लागत नव्हतीं. तो मग आजोबांनीं लावलेल्या वॉलनटच्या राईंत गेला नि तिथं पडलेलीं सुंदर वॉलनटस् निवडून तो खिशांत घालूं लागला तेव्हां कुठं त्याच्या लक्षांत आलं कीं, एक गोष्ट आपण तिला सांगायची पार विसरून गेलों. जायच्या आधीं ओढ्यावर येऊन मला भेटल्याशिवाय राहूं नको असं त्याला तिला सांगायचं होतं. पण तें तसंच राहून गेलं. खरंच, किती रे वेडा तूं ! किती रे वेडा !

चन्द्रोत्सवाच्या आदल्या दिवशीं तो शाळेंतून घरीं परत आला तेव्हां आपले वडील कपडे घालून कुठंतरी बाहेर जायला निघालेले त्याला दिसले. त्यांच्या हातांत एक कोंबडी होती.

" एवढी मोठी पुरे का ? "

मग आईनं त्यांना एक गवताची पिशवी दिली.

" मला वाटतं, एवढी कोंबडी पुरे होईल. "

आईकडे वळून त्या मुलानं, बाबा कुठं चालले आहेत असं तिला विचारलं तेव्हां ती म्हणाली, "ते चालले आहेत यून कुटुंबाच्या घरीं. उद्यां चन्द्रोत्सवासाठीं ही कोंबडी लागणार आहे. "

" पण या कोंबडीऐवजीं तो ठिपकेवाला मोठा कोंबडा कां नाहीं नेत ते ? "

घाईघाईनं त्यानं हातांतलीं पुस्तकं तिथंच टाकलीं नि गोठ्यांत जाऊन तिथल्या बैलाच्या पाठीवर त्यानं उगीचच चापट मारली.

\+ \+ \+ \+

हवेंतला गारवा वाढत होता तसं ओढयाचं पाणी अधिकाधिक स्वच्छ दिसूं लागलं होतं. तो मुलगा रस्त्याच्या बेचक्यापाशीं आला नि दुसऱ्या रस्त्यानं चालूं लागला. वेळूवनापाशीं तो क्षणभर थांबला नि ती रहात होती तिच्या घराच्या दिशेनं त्यानं नजर फेंकली. पावसाळी हवेमुळें सारं कसं आरशासारखं लख्ख झालं होतं अन् त्यामुळेंच त्या मुलीचा गांवहि, होता त्यापेक्षां कितीतरी जवळ दिसत होता.

ती अन् तिच्या घरचीं माणसं उद्यां यांगप्योंगला जाणार असल्याचं त्यानं ऐकलं होतं. तिथं ते छोटसं दुकान काढणार होते. एक हात खिशांत घालून तो वॉलनट्स् कुरवाळीत होता अन् दुसऱ्या हातानं उगीचच वेळूंच्या पानांना स्पर्श करीत होता.

सबंध रात्र तो तिच्या जाण्याचाच विचार करीत राहिला होता. तिला निरोप द्यायला जावं कीं नाहीं...गेलोंच तर आपल्याला...

त्याचा नुकता कुठं डोळ्याला डोळा लागत होता. तेवढ्यांत कुणाचा तरी आवाज त्याच्या कानावर आला.

" काय एकेक विचित्र गोष्टी घडतात तरी ! "

त्याचे वडील घरीं परतले होते.

" यून कुटुंबाची अगदीं वाताहत चालली आहे. होती नव्हती तेवढी इस्टेट गेली. पिढ्यानुपिढ्या रहात असलेलं घरहि निकालांत निघालं. अन् आतां मुलीचा मृत्यु..."

घासलेच्या दिव्याचा मिणमिण प्रकाश पडला होता. तेवढ्या प्रकाशांतहि त्याची आई सुईंत दोरा ओंवीत होती. दोरा ओंवतां ओंवतां ती म्हणाली, " एकुलती एक पणती होती ती त्यांची नव्हे का ? "

" हं...दोन नातू होते त्यांचे अगदीं वयांत आलेले. पण तेहि कांहीं वर्षांपूर्वी वारले. "

" कांहींकांहीं जणांना मुलं लाभतच नाहींत बघा ! "

" नाहींतर काय ? गेले कित्येक दिवस म्हणे ती अंथरूणाला खिळून होती, पण धड औषधपाणीहि करूं नाहीं शकले ते तिला. पण ती मुलगी मोठी विचित्र असावी. मरतांना ती काय म्हणाली ठाऊक आहे ? ती म्हणाली, ' मी गेल्यावर मला पुराल तेव्हां माझ्या अंगावरचे हे कपडे काढूं नका. ' "

• • •

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

Dindvall Monthly July 1959
REGD. NO. B-7640


भारतीय शेतकरी-१

# "१० वर्षापूर्वी मी किर्लोस्कर एंजिन घेतलें. आज देखील नव्याप्रमाणें उपयुक्त..."



मु. वडगांवरासई.
पो. पारगांव, जि. पुणें

बिंजराज शिवलाल सारडा

दि. २३-१-१९५९

मे. किर्लोस्कर ऑईल एन्जिन्स लि.
खडकी, पुणें - ३

स. न. वि. वि.

आज मुद्दाम पत्र लिहिण्यास कारण कीं, मी आपले कारखान्यांत तयार झालेलें पहिले एंजिन १९४९ सालीं पुणें येथें भरलेल्या प्रदर्शनांत विकत घेतलें. सदरहू एंजिन व पंप गेलीं १० वर्षे व आजतागायत उत्कृष्ट कामगिरी बजावीत आहेत.

आपला पंपिंग सेट बसवल्यापासून आमच्या उत्पन्नांत २० ते २५ पटीनें वाढ झाली असून, खर्चातदेखील पुष्कळच बचत झाली आहे. माझा अनुभव जमेस धरून या भागांतील व गावांतील इतरही बरेच शेतकरी बंधू किर्लोस्कर पंपिंग सेटस् खरेदी करून वर्षानुवर्षे "अधिक धान्य पिकवा" या सरकारी मोहिमेस हातभार लावीत आहेत.

आपलें किर्लोस्कर एंजिन चालविण्यास सोपें असून, अत्यंत टिकाऊ आहे. एंजिनला लागणारे सुटे भाग आपल्या एजंटामार्फत तावडतोब मिळत असल्यानें आमचा कधींही खोळंबा झालेला नाही.

किर्लोस्कर एंजिनामुळें माझ्या वैभवांत भर पडली आहे व म्हणूनच मी किर्लोस्कर कंपनीचा अत्यंत आभारी आहे.

आपला कृपाकांक्षी

KOE

## किर्लोस्कर एंजिनांची गरज
## किर्लोस्कर एंजिनेंच भरून काढतात

किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि., खडकी, पुणें ३

TOM & BAY KOEL/M-2/59


COVER PRINTED BY: SADHANA ART PRINTERS, BOMBAY-5

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट